# नवभारत

वर्ष २४ वे ]          एप्रिल १९७१          [ अंक ७



वार्षिक वर्गणी ९ रु. ]          [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका









नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**

**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष चोविसावे | अंक सातवा

# नवभारत

एप्रिल १९७१

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. मे. पुं. रेगे का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, ' नवभारत ' मासिक,
प्राध्यापकांचे निवासस्थान
कीर्ति कॉलेज, दादर-मुंबई २८

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक,
C/o दी प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. बा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमरावबाडी, मुंबई २
फोन नं. ३५४८५४

डॉ. वा. वि. मिराशी

# 'विद्धशालभञ्जिके'तील ऐतिहासिक समस्या

राजशेखराच्या 'विद्धशालभञ्जिका' नाटिकेचे कथानक इतर अनेक संस्कृत नाटकातल्याप्रमाणे अन्तःपुरातील कारस्थानावर आधारित असले तरी त्याला ऐतिहासिक पृष्ठभूमि आहे हे आम्ही 'संशोधनमुक्तावलि', सर १ (पृ. १८८–१९५) मध्ये दाखविले आहे. त्यात उल्लेखिलेल्या ऐतिहासिक घटनांचा निराळा अर्थ लावण्याचा प्रयत्न अलीकडे कुरुक्षेत्र विश्वविद्यालयाच्या प्राचीन भारतीय इतिहास आणि संस्कृति विभागाचे प्रमुख डॉ. बुद्धप्रकाश यांनी केला आहे.[१] सत्यान्वेषणार्थ त्याचे परीक्षण करणे अवश्य आहे.

वाचकांना पुढील विवेचन समजण्याकरिता प्रथम त्या नाटिकेचे कथानक संक्षेपाने देणे आवश्यक आहे ते असे—

त्रिपुरी (जवलपूरजवळचे सध्याचे तेवर) येथे राज्य करणाऱ्या कर्पूरवर्ष नामक करचुलि राजाच्या दरबारी कुन्तल देशाचा राज्यभ्रष्ट वीरपाल ऊर्फ चंडमहासेन आश्रयार्थ येतो. त्याच्या कुवलयमाला नामक मुलीवर कर्पूरवर्षाचे प्रेम बसते. कर्पूरवर्षाच्या राणीचा मामा लाट (गुजराथ) देशाधिपति चन्द्रवर्मा याला मुलगा नसल्याने त्याने आपल्या मृगांकावलि नामक मुलीलाच मुलगा म्हणून वाढविले होते आणि त्याचे नाव मृगांकवर्मा असे ठेवले होते. कर्पूरवर्षाच्या राणीला मात्र याची माहिती नव्हती. मृगांकावलीचे ज्याच्याशी लग्न होईल त्याला चक्रवर्तिपद प्राप्त होईल असे भविष्य ज्योतिष्यांनी वर्तविले होते. ते माहीत झाल्यामुळे कर्पूरवर्षाचा मंत्री भागुरायण याने मृगांकावलीला मृगांकवर्मारूपाने काही निमित्ताने त्रिपुरीला आणले होते. त्याचे कन्यासदृश रूप पाहून राणी त्याला केव्हा केव्हा मौजेने स्त्रीवेष देत असे. त्या वेषात मृगांकावलीला पाहिल्यावर कर्पूरवर्ष तिच्यावर आसक्त होतो. राणीला राजाचे कुन्तलराजकन्या कुवलयमाला हिच्यावरहि प्रेम बसले आहे हे समजल्यामुळे ती तिचा विवाह आपला मामेभाऊ मृगांकवर्मा याच्याशी करण्याचे योजते. तसेच नित्य नव्या स्त्रीवर आषक्त होणाऱ्या आपल्या पतीची फजीती करण्याच्या उद्देशाने ती त्याला 'माझ्या मामांनी मृगांकवर्म्याच्या बहिणीला विवाह जमविण्याकरिता येथे पाठविले आहे. मी तिचा तुमच्याशी विवाह लावून देणार आहे. त्याकरिता तयार असावे' असा निरोप पाठवते. राजा अर्थातच त्याला संमति देतो. ठरल्याप्रमाणे विवाह होऊन लाजाहोमहि होतो. इतक्यात लाटदेशाधिपति चंद्रवर्म्याकडून राणीला निरोप येतो की 'मला नुकताच पुत्र झाला आहे. तेव्हा मी मुलगा म्हणून वाढविलेल्या माझ्या मृगांकावलि कन्येचा विवाह योग्य वराशी करावा'. तेव्हा राणीला आपलीच फजीती झाल्याचे कळते. तथापि झाले ते ठीकच झाले असे मानून ती राजाच्या मृगांकावलीशी झालेल्या विवाहाला संमति देते, एवढेच नाही तर विदूषकाच्या सूचनेप्रमाणे राजाचे कुन्तलराजकन्या कुवलयमाला हिच्याशीहि लग्न लावून देते. इतक्यात राजाचा सेनापति श्रीवत्स याच्याकडून आलेला दूत राजाला पुढील आशयाचा खलिता सादर करतो— 'पदभ्रष्ट झालेला कुन्तलाधिपति वीरपाल आपल्या आश्रयार्थ आला होता. त्याला पुढे घालून आम्ही पयोष्णीच्या तीरावर तळ दिला. तेथे घनघोर लढाई होऊन आमचा जय झाला. नंतर आम्ही वीरपालाला त्याच्या गादीवर बसविले'. तेव्हा भागुरायण मंत्री कर्पूरवर्ष राजा सार्वभौम झाल्याचे जाहीर करतो.

१. डॉ. मिराशी फेलिसिटेशन व्हॉल्यूम, पृ. ४०६–४२३ ; उमेश मिश्र कामेमोरेशन व्हाल्यूम, पृ. ३६७–३७५.









अनुक्रमणिका

'विद्धशालभञ्जिकेच्या कथानकाच्या वर दिलेल्या सारांशावरून त्याला लावलेल्या ऐतिहासिक झालरीची वाचकांस कल्पना येईल. त्यात उल्लेखिलेली घटना खरोखरीच घडली असावी असे आम्ही आमच्या 'संशोधनमुक्तावली', सर १, मधील पूर्वोक्त लेखात सविस्तर दाखविले आहे. राजशेखराने स्वकालीन ऐतिहासिक व्यक्तींची नांवे थोडीबहुत बदललेली आहेत. त्रिपुरीचा करचुली कर्पूरवर्ष हा कलचुरिनृपति केयूरवर्ष– प्रथम युवराजदेव ( सन ९१५–९४५ ) हा होय. त्याच्या दरबारी त्याचा जामात राष्ट्रकूटवंशी बद्दिग ऊर्फ तृतीय अमोघवर्ष काही वर्षे राहत होता असे तत्कालीन कोरीव लेखांवरून[1] दिसते. त्यावेळी त्याचा पुतण्या चतुर्थ गोविंद हा मान्यखेट ( सोलापूरच्या आग्नेयेस ९० मैलावरचे मालखेड ) येथील गादीवर होता. बद्दिग– अमोघवर्ष याने विदर्भातील अचलपूरच्या कर्करनामक राष्ट्रकूट सामंताशी युद्ध करून विजय मिळविला होता असा कोरीव लेखात उल्लेख आढळतो.[2] अचलपुर पयोष्णी ( पूर्णा ) नदीच्या तीरापासून केवळ दहा मैल असल्याने 'विद्धशालभञ्जिके'त वर्णिलेली कलचुरि व राष्ट्रकूट सैन्यांची लढाई अचलपुराजवळच झाली असावी असे दिसते. नंतर राष्ट्रकूटांच्या काही इतर सामन्तांप्रमाणे कलचुरि सेनापतीने मान्यखेटावर चाल करून चतुर्थ गोविन्दाला पदच्युत केले आणि त्याचा चुलता बद्दिग ऊर्फ तृतीय अमोघवर्ष याला मान्यखेटच्या गादीवर बसविले असावे. याप्रमाणे 'विद्धशालभञ्जिके'त उल्लेखिलेल्या ऐतिहासिक घटनेची उपपत्ति लावता येते, असे आम्ही 'संशोधनमुक्तावलि, सर १' मधील लेखात दाखविले होते.

डॉ. बुद्धप्रकाश यांनी 'विद्धशालभञ्जिके'त उल्लेखिलेल्या घटनेचा निराळाच अर्थ लावण्याचा प्रयत्न केला आहे. ते म्हणतात, "वीरपाल हा राष्ट्रकूट नृपति बद्दिग-तृतीय अमोघवर्ष असणे शक्य नाही. बद्दिग हा कलचुरि नृपति केयूरवर्ष –युवराजदेव याचा जामात होता तेव्हा 'विद्धशालभञ्जिके'तल्या वीरपालरूपाने तो विवक्षित असल्यास त्याच्या कुवलयमाला कन्येचा त्या नाटिकेत दाखविल्याप्रमाणे त्याचा श्वशुर केयूरवर्ष याच्याशी विवाह होणे कसे शक्य आहे ? तश्यासारख्या घटनेच्या केवल उल्लेखानेहि राजसभेतील लोकांना भयंकर धक्का बसला असता. तेव्हा वीरपाल नावाने दुसरा कोणी विवक्षित असला पाहिजे.

तत्कालीन इतिहासाचा विचार करिता वीरपालाच्या रूपाने आंध्र प्रदेशातील पूर्वचालुक्य वंशी भीम–ज्याला 'चालुक्य द्वितीय भीम' असेहि नाव होते–तो असावा. त्याची राजमार्तंड आणि चण्डमहेन्द्र अशी बिरुदे होती; त्यांपैकी दुसरे 'विद्धशाल भञ्जिके'तील वीरपालाच्या 'चण्डमहासेन' या बिरुदासारखे आहे. तो वेंगी येथील पूर्वचालुक्यांच्या गादीवर हक्क सांगत होता. पण ती त्याला न मिळता त्याच्या द्वितीय युद्धमल्ल नामक दूरच्या नातेवाईकाने मान्यखेटच्या राष्ट्रकूटांच्या साहाय्याने बळकाविली होती. युद्धमल्लाने सन ९२८ ते ९३४ पर्यंत सात वर्षे राज्य केले. या काळात राष्ट्रकूटांचे त्याच्यावर फार वर्चस्व होते. म्हणून चालुक्य द्वितीय भीम याने त्रिपुरीच्या कलचुरि युवराज देवाच्या

१. अॅन्युअल रिपोर्ट ऑफ दि आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ् मैसूर, ( १९२१ ), पृ. २१–२२; एपिग्राफिया इंडिका व्हा. ३, पृ. १७९.

२. शिलाहार अपराजितांच्या मुरुड–जंजिरा ताम्रपटातील बद्दिग–अमोघवर्षाच्या वर्णनातील पुढील श्लोक पहा–

श्रीमत्कर्कर राष्ट्रकूटकटकेऽसद्वंशसंघर्षतो
रौद्रद्रोहदवप्रतापशमनं निस्त्रिंशधाराजलैः ।
येनाकारि समुद्धृतेन्द्रधनुषा भूपाश्मभिर्विद्युता
भाति श्रीमदमोघवर्षसुघनोऽसद्धूलिविध्वंसनात् ॥

याचे भाषांतर 'संशोधनमुक्तावलि,' सर १, पृ. १९४–९५ वर पाहा.

साहाय्याची याचना केली असावी आणि त्याकरिता त्याला आपली कन्या देऊन वैवाहिक संबंध जोडला असावा. तो कुवलयमालेच्या विवाहाच्या रूपाने 'विद्धशालभञ्जिके'त वर्णिला आहे.

भीमाच्या साहाय्यार्थ पाठविलेल्या सेनेची राष्ट्रकूटांशी पयोष्णीच्या (पूर्णेच्या किंवा पैनगंगेच्या) तीरी घनघोर लढाई झाली. तीत राष्ट्रकूटांचा पराभव झाल्यावर कलचुरि सेनेने चालुक्य द्वितीय भीमास वेंगीच्या गादीवर बसविले. नंतर राष्ट्रकूटांच्या राज्यात क्रांति होऊन केयूरवर्षाचा जावई बद्दिग अमोघवर्ष याला गादी मिळाली पण पुढे त्याचा मुलगा तृतीय कृष्ण यास कलचुरींच्या सामर्थ्याचा हेवा वाटून त्याने युवराजदेवाचा पराभव केला[1]. तेव्हा कलचुरींनी कित्येक पिढ्या चालत आलेले राष्ट्रकूटांशी सलोख्याचे संबंध तोडून टाकून उत्तरकालीन चालुक्यांशी सख्य केले आणि राष्ट्रकूटांचा उच्छेद केला."[२]

'विद्धशालभञ्जिके'तील ऐतिहासिक घटनेची डॉ. बुद्धप्रकाश यांनी सुचविलेली वरील उपपत्ति स्वीकारण्यात अनेक अडचणी आहेत. त्यांचा आता विचार करू –

(१) वीरपाल हा पूर्वचालुक्य वंशातील चालुक्य द्वितीय भीम होय हे सिद्ध करण्याकरिता त्या दोघांच्या बिरुदांतील साम्य हे एक कारण बुद्धप्रकाश यांनी दिले आहे पण त्यांत त्यांची फसगत झाली आहे. वीरपालाच्या 'चंडमहासेन' या बिरुदाचा विद्धशालभंजिकेत उल्लेख आहे. पण चालुक्य भीमाचे बिरुद बुद्धप्रकाश समजतात त्याप्रमाणे 'चण्डमहेन्द्र' नसून 'गण्डमहेन्द्र' असे होते.[२] या दोन बिरुदात मुळीच साम्य नाही.

(२) 'विद्धशालभञ्जिके'त वीरपाल हा कुन्तलदेशाच्या गादीवर हक्क सांगत असलेला दाखविला आहे. पुढे पयोष्णीच्या युद्धानंतर कलचुरींच्या साहाय्याने त्याला ती गादी मिळाली, पण चालुक्य भीम हा आन्ध्र देशातील चालुक्यांच्या गादीकरिता झगडत होता–कुन्तलाधिपत्याकरिता नव्हे. म्हणून ते दोघे एक असणे शक्य नाही.

बुद्धप्रकाशांच्या उपपत्तीच्या मार्गात ही सर्वांत मोठी धोंड आहे. ती बाजूला सारणे अगदी अशक्य आहे. कुन्तल याने सर्व कानडी प्रदेश विवक्षित होता असे ते म्हणतात. पण आंध्र प्रदेश कधीही कानडीभाषी नव्हता. शेवटी 'कुन्तल शब्दाचा अनेकवचनी प्रयोग केल्यास त्याने सबंध दक्षिण भारताचा उल्लेख होत असे' असे मोठे साहसी विधान त्यांनी आपल्या उपपत्तीच्या समर्थनार्थ करून ठेवले आहे. पण त्याचे एकहि उदाहरण दिले नाही. त्यांना माहीत नाही काय की संस्कृतमध्ये देशांची नावे नेहमी अनेकवचनातच योजिली जातात. जसे 'विदर्भेषु' म्हणजे विदर्भदेशात.[३] त्या नावाला 'देश' यासारखे उपपद जोडले असल्यास मात्र त्याचा एकवचनी उपयोग होतो. एरवी त्याचा अर्थ त्या देशाचा राजा असा अर्थ होतो जसे 'कुन्तलः कुन्तशाली' ('विद्धशालभञ्जिका', अंक ४.) तेव्हा 'कुन्तलपति' शब्दाने आंध्रनृपति चालुक्यभीम विवक्षित असणे कदापि शक्य नाही.

(३) आणखी असे की, हा चालुक्यभीम कधी काळी कलचुरींचे साहाय्य मागण्यास त्रिपुरीला गेला होता याला मुळीच पुरावा नाही. ती बुद्धप्रकाशांची केवळ कपोलकल्पना आहे.

(४) बद्दिग–अमोघवर्षाच्या राज्यारोहणा नंतर कलचुरि आणि राष्ट्रकूट यांचे संबंध बिघडले असे

---

१. तृतीय कृष्णाच्या देवळी ताम्रपटातील पुढील श्लोक पाहा –
रामहतसहस्रभुजो भुजद्वयाकलितसमदरामेण ।
जननीपत्नीगुरुरपि येन सहस्रार्जुनो विजितः ॥

२. पागनवरम् ताम्रपटातील ओळ ४५ पाहा.
इंडियन अॅंटिक्वरी, व्हॉ. १३, पृ. २१४ व २१५ यामधील प्लेट पाहा.

३. 'अस्ति दक्षिणापथे विदर्भेषु पद्मपुरं नाम नगरम्।' मालतीमाधव, अं. १.










मानण्यास मुळीच पुरावा नाही. त्याकरिता बुद्ध-प्रकाशांनी उद्धृत केलेल्या पुढील श्लोकाचा[1] अर्थ त्यांना कळला नाही—

रामहतसहस्रभुजो भुजद्वयाकलितसमदरामेण ।
जननीपत्नीगुरुरपि येन सहस्रार्जुनो विजितः ॥

-या श्लोकात बद्दिग—अमोघवर्षाच्या तृतीय कृष्ण या पुत्राचे वर्णन आहे. त्याची माता आणि पत्नी या कलचुरि वंशातील होत्या. कलचुरि राजे आपला वंश कार्तवीर्य सहस्रार्जुन याच्यापासून उत्पन्न झाला असे मानत असत. वरील श्लोकात कृष्णराजाने सहस्रार्जुनालाहि मागे टाकले असे श्लेषांच्या साहाय्याने वर्णिले आहे. त्या श्लोकाचा अर्थ असा : ज्याने आपल्या दोन्ही बाहूंनी मदविवश अशा स्त्रियांना कवटाळले आहे अशा त्या तृतीय कृष्ण राजाने परशुरामाने ज्याचे सहस्र बाहू कापून टाकले त्या कार्तवीर्य सहस्रार्जुनावर— तो आपल्या मातेचा आणि पत्नीचा पूर्वज होता तरी— सरशी केली.

येथे सहस्रार्जुन हा बुद्धप्रकाश समजतात तसा कोणी कलचुरि राजा विवक्षित नाही. या तऱ्हेच्याच दुसऱ्या एका श्लोकाकडे आम्ही इतरत्र लक्ष वेधले आहे.[2]

(५) 'विद्धशालभंजिके'तील वीरपालाने चालुक्य भीम विवक्षित होता असे मानले, तरी त्याला वेंगीच्या गादीवर बसविण्याकरिता पाठविलेल्या कलचुरि सेनेने छत्तीसगड, बस्तर संस्थान इत्यादि मार्गाने आंध्रप्रदेशावर स्वारी करावयास पाहिजे होती. पूर्वीच्या समुद्रगुप्त, ईशानवर्मा मौखरी इत्यादि राजांनी याच मार्गाचा अवलंब करून पूर्वकिनाऱ्यावरची कलिंग व आंध्र देशातील राज्ये जिंकली होती.[3] तो सरळमार्ग सोडून वीरपालाबरोबरचे कलचुरि सैन्य विदर्भातून कशाला जाईल ? आंध्रदेशावर स्वारी करताना त्याची शत्रुसैन्याशी पयोष्णीच्या (पूर्णेच्या) काठी चकमक होणे सुतराम् असंभवनीय आहे.

तेव्हा 'विद्धशालभञ्जिके' तील वीरपाल हा पूर्वचालुक्यवंशी चालुक्यद्वितीय भीम होय या डॉ. बुद्धप्रकाश यांच्या मताला काडीचाही आधार नाही.

याच्या उलट त्या वीरपालाच्या रूपाने राष्ट्रकूटवंशी बद्दिग ऊर्फ तृतीय अमोघवर्ष विवक्षित होता असे मानण्यास भरपूर पुरावा आहे. तत्कालीन राष्ट्रकूट नृपति चतुर्थ गोविंद याचा तो चुलता असून मान्यखेटच्या गादीवर हक्क सांगत होता. राष्ट्रकूटांची राजधानी कानडी प्रदेशात असल्यामुळे कोरीव लेखात त्याना 'कुन्तलाधिपति' असे म्हटले आहे.[4] बद्दिग—अमोघवर्ष काही काळ कलचुरींच्या आश्रयास रहात होता असे कुडलूर[5] आणि सुदी[6] ताम्रपटात म्हटले आहे. त्रिपुरी येथे असताना त्याने आपल्या रेवकनिम्मडी नामक कन्येचा गंगनृपति पेरमाडी बूतुग याच्याशी विवाह केला होता.[7] त्याचा पुत्र तृतीय कृष्ण याचाहि विवाह एका कलचुरी राजकन्येशी झाला होता. तेव्हा त्रिपुरीचा कलचुरि नृपति युवराजदेव याने बद्दिगाचा पक्ष घेऊन त्याला गादीवर बसविण्याकरिता सैन्याची मदत दिली असली तर नवल नाही. त्रिपुरीहून मान्यखेटचा मार्ग विदर्भातूनच जातो. तेव्हा वाटेत त्या सैन्याचे अमरावती जिल्ह्यातील अचलपुरच्या कर्कर नामक चतुर्थ गोविंदाच्या

---

१. या श्लोकाने डॉ. रामकृष्णपंत भांडारकरांसारख्या विद्वानांना चकविले होते. शेवटी त्याचा बरोबर अर्थ प्रा. नीलकंठ शास्त्री यांनी प्रथम लावला.

२. संशोधनमुक्तावलि, सर ५, पृ. १६५–१७०.

३. समुद्रगुप्ताने दक्षिण कोसल (छत्तीसगड) आणि महाकान्तार (बस्तर जिल्हा) आक्रमन नंतर पूर्वकिनाऱ्यावरच्या एरण्डपल्ल वगैरे देशांच्या राजांचा पराभव केला. त्याची अलाहाबाद प्रशस्ति पाहा.

४. राजशेखराच्याच 'कर्पूरमंजरी' या प्राकृत नाटकातील तत्कालीन राष्ट्रकूट राजाचे उल्लेख पाहा — अत्थि एत्थ दक्खिणावधे कुन्तलेसु सअलजणवल्लहो वल्लहराओ णाम राआ ।

५. ॲ. रि. आ. स. मैं. (१९२१) पृ. २१–२२

६. ए. इं. व्हॉ. ३, पृ. १७९

७. पूर्वोक्त.








पक्षाच्या राष्ट्रकूट सामन्ताच्या सैन्याशी पयोष्णी ( पूर्णा ) नदीच्या तीरावर युद्ध झाले असल्यास नवल नाही. अमोघवर्ष ( बद्दिग ) याने कर्कराचा पराजय केल्याचा उल्लेख कोरीव लेखात आला आहे तो याच युद्धासंबंधी असावा.[१] या विजयोत्सवातच त्रिपुरी येथे 'विद्धशालभञ्जिका प्रथम रंगभूमीवर आलेली दिसते.

या विजयानंतर कलचुरि आणि राष्ट्रकूट यांचे संबंध पूर्वीपेक्षाहि दृढतर झालेले दिसतात. बद्दिगाचा पुत्र तृतीय कृष्ण याने कलचुरि युवराजदेवाचा पराजय केला होता असे मानण्यास मुळीच पुरावा नाही. मागे उद्धृत केलेल्या श्लोकात त्या कृष्णनृपतीने कार्तवीर्य सहस्रार्जुनावर सरशी केल्याचे आलंकारिक वर्णन आहे, कलचुरी राजाच्या पराभवाचे नाही हे मागे दाखविले आहे. एवढेच नव्हे तर या युद्धानंतर आपल्याला मान्यखेटची गादी मिळाल्यावरही शांतप्रकृतीच्या चिन्तनशील बद्दिगाने राज्यकारभाराची दगदग आपला पुत्र कृष्ण यावर सोपवून स्वतः त्रिपुरी येथेच कालक्रमणा करण्याचे पसंत केले होते हे आम्ही तत्कालीन एका तन्त्रविषयक ग्रंथातील उताऱ्यावरून दाखविले होते.[२] तेव्हा 'विद्धशालभञ्जिका' नाटिकेतील वीरपाल हा राष्ट्रकूटनृपति बद्दिग-अमोघवर्षच होय हे सिद्ध करण्यास भरपूर पुरावा आहे.

पण मग त्या वीरपालाच्या कुवलयमाला नामक कन्येचा विवाह कर्पूरवर्ष ( कलचुरिकेयूरवर्ष ) याच्याशी झाल्याचे त्या नाटिकेत दाखविले आहे ते कसे ? असा प्रश्न उत्पन्न होतो. सकृद्दर्शनी ही गोष्ट असंभाव्य वाटते खरी. पण डॉ. अळतेकरांनी म्हटल्याप्रमाणे राजशेखराने त्या नाटकातील प्रेमकथानक जास्त गुंतागुंतीचे करण्याकरिता ही घटना त्यात घातली असावी. त्या घटनेची कथानकाच्या प्रगतीसाठी मुळीच आवश्यकता नाही. असे असताहि ही असंभाव्य आणि आक्षेपार्ह घटना त्या नाटकात घालणे हे अविवेकीपणाचे लक्षण आहे. राजशेखराच्या बाबतीत हा अविवेक सुतराम् संभवनीय आहे. कारण त्याने इतक्या मूर्खपणाचे नसले तरी अनेक अविवेकी प्रसंग आपल्या इतर ग्रंथांत घातले आहेत. त्यांपैकी काहींचा निर्देश येथे करू.

(१) राजशेखराने 'बालरामायणा'त सीतेच्या स्वयंवराकरिता अनेक स्वकालीन राजे उपस्थित असल्याचे वर्णिले आहे. त्यांमध्ये त्रिपुरीचा चेदि नृपति, लाट ( गुजराथ ) देशाचा चुलुक्य राजा, मरहट्ट ( महाराष्ट्र ) देशाधिपति, शक राजा यांचा अंतर्भाव आहे. यांतील कालविपर्यासाची राजशेखराला जाणीव नाही !

(२) 'बालरामायणा'च्या चौथ्या अंकांत शतानन्द सीतेला पुढील उपदेश करतो —

निर्व्याजा दयिते ननान्दृषु नता श्वश्रूषु भक्ता भव
स्निग्धा बन्धुषु वत्सला परिजने स्मेरा सपत्नीष्वपि।
पत्युर्मित्रजने सनर्मवचना खिन्ना च तद्द्वेषिषु
स्त्रीणां संवननं नतभ्रु तदिदं कान्तौषधं भर्तृषु ।।

ह्या श्लोकात राजशेखराने शाकुन्तलातील कण्वाच्या 'शुश्रूषस्व गुरून्' इत्यादि श्लोकाचे अनुकरण केले आहे हे स्पष्ट आहे. पण ते करताना शकुन्तलेप्रमाणे सीतेला विवाहापूर्वी आणि नंतरहि कधीही सवती नव्हत्या तेव्हा त्यांच्याशी स्मितपूर्वक वर्तन करण्याचा

---

१. पृ. २ टीप २ पाहा.

२. त्या ग्रंथातील पुढील उतारा पुष्कळ वर्षांपूर्वी नेपाळ म्यूझियमचे संचालक डॉ. एस्. एन्. सेन यांनी मला पाठवला होता. सन १९४१ मध्ये हैदराबाद येथे ओरिएंटल कॉन्फरन्सच्या वेळी मी तो त्यांच्या जवळील हस्तलिखितात वाचला होता —

गतवति शककाले मङ्गलेष्वष्टसंख्ये शरदि विशदपक्षे चाश्विने शुक्रवारे ।
उडुनि सुरपतीशे योग आयुष्मतीयं तिथिरपि च गतानां पञ्चमी यत्र शुद्धा ।। चेदिकुलराजधान्यां गतवति श्रीवच्चगे निहत्यारीन् । तच्छासनेन वसुधां परिरक्षति कृष्णराजेऽपि ।। ही तिथी (शुक्रवार, आश्विन शु. ५ शक ८५८ ) २३ सप्टेंबर सन ९३६ ला बरोबर जुळते. या उताऱ्यात बद्दिग चेदि देशाच्या राजधानीत त्रिपुरी येथे राज्य मिळाल्यावरही राहत होता असे म्हटले आहे.

तिला उपदेश करणे मूर्खपणाचे आहे हे त्याच्या ध्यानात आले नाही.

(३) 'बालरामायणा'च्या आठव्या अंकांत राजशेखराने राम व सीता यांचा लंकेतून अयोध्येपर्यंतचा विमानांतून प्रवास वर्णिला आहे. त्यांत त्यांना प्रथम हिमालय कैलास, मानस-सरोवर, इन्द्राची अमरावती, आणि नंतर पृथ्वीवरील ताम्रपर्णी, गोदावरी, भीमेश्वर, आन्ध्रदेश, कावेरी वगैरे नद्या देश, पर्वत वगैरेचे वर्णन भौगोलिक क्रम धाब्यावर बसवून केले आहे. त्यांतील विसंगतीचे त्याला भान नाही !

(४) 'विद्धशाल भञ्जिके'च्या चौथ्या अंकांत कर्पूरवर्षाची राणी आपण आपल्या पतीचा विवाह मगध, मालव, पाञ्चाल, अवन्ती, जालन्धर आणि केरल या देशांच्या राजकन्यांशी त्यापूर्वीच घडवून आणला होता, असे म्हणते. हे विवाह खरोखरच घडले होते काय ? त्या काली ( ख्रिस्तोत्तर दहाव्या शतकाच्या आरंभी ) मालव आणि अवन्ति येथे दोन भिन्न राजे राज्य करीत होते काय ? त्यापूर्वी परमारांचे माळव्यावर स्वामित्व प्रस्थापित झाले होते तेव्हा वरील विधान खरे वाटत नाही. कलचुरींचे केरलदेशाधिपाशी वैवाहिक सख्य स्थापन झाले होते याला मुळीच पुरावा नाही.

(५) आपल्या आश्रयदात्यांच्या विजयांच्या वर्णनात राजशेखर सत्यापेक्षा अनुप्रास प्रेमाने आकृष्ट झालेला दिसतो. उदाहरणार्थ त्याच्या 'बालभारता'-तील प्रतीहारनृपति महीपालाचे खालील वर्णन पाहा–

नमितमुरलमौलिः पाकलो मेकलानां
रणकलितकलिङ्गः केलितट् केरलेन्दोः।
अजनि जितकुलूतः कुन्तलानां कुठारो
हठहृतरमठश्रीः श्रीमहीपालदेवः ॥

–या श्लोकात कनोजच्या महीपालाने जवळच्या कुलूतदेशाधिपतींवरच नव्हे तर दूरच्या कलिङ्ग, मुरल आणि केरल देशांच्या अधिपतींवरहि विजय मिळविल्याचे वर्णन आहे. त्याला काडीचाहि आधार नाही. वरील श्लोकातील देशांची नावे अनुप्रासामुळे सुचलेली दिसतात.

राजशेखर हा अत्यंत थापाड्या होता. त्याने आपल्या अनेक श्लोकात प्राचीन कवीविषयी मनोरंजक माहिती दिली आहे खरी, पण त्याच्या कित्येक श्लोकांनी विद्वानांपुढे दुर्जेय समस्याहि उत्पन्न केल्या आहेत. उदाहरणार्थ त्याचे तीन कालिदास[1] आणि दण्डीचे तीन प्रबन्ध[2] याविषयी श्लोक पाहा. त्याची विधाने स्वीकारण्यापूर्वी ती स्वतंत्र पुराव्याने समर्थनीय आहेत काय हे पाहिले पाहिजे. त्याने 'विद्धशालभञ्जिके'च्या चौथ्या अंकात उल्लेखिलेल्या अनेक राजकन्यांच्या विवाहाप्रमाणे कुन्तलराजकन्येचा कलचुरि नृपति वीरपालाशी विवाहही केवळ काल्पनिक आहे[3] आणि तो त्या नाटिकेतील प्रेमप्रसंग जास्त गुंतागुंतीचा करण्याकरिता घातला आहे. तसा विवाह होणे अशक्य आहे हे समजण्याचा विवेक राजशेखराच्या ठिकाणी नव्हता !

वरील विवेचनावरून विद्धशालभञ्जिकेतील 'वीरपाल' या पात्राने पूर्वचालुक्यनृपति चालुक्य द्वितीय भीम हा विवक्षित नसून तत्कालीन कुन्तलाधिपति बद्दिग–अमोघवर्ष हाच अभिप्रेत होता हे स्पष्ट होईल.

---

१. एकोऽपि जीयते हन्त कालिदासो न केनचित् ।
शृङ्गारे ललितोद्गारे कालिदासत्रयी किमु ॥

२. त्रयोऽग्नयस्त्रयो वेदास्त्रयो धर्मास्त्रयो गुणाः ।
त्रयो दण्डिप्रबन्धाश्च त्रिषु लोकेषु विश्रुताः ॥

३. राजशेखराने कर्पूरमञ्जरीतहि विदर्भातील वच्छोम ( वत्सगुल्म ) येथील कुन्तलराजकन्येचा कनोजच्या महीपाल राजाशी झालेला विवाह वर्णिला आहे.

वत्सगुल्म ही कधीही राष्ट्रकूटांची राजधानी नव्हती. ती राजशेखराची जन्मभूमि असल्याने त्याने हे काल्पनिक विधान केले असावे.








प्रा. प्रभाकर पोहरे

# ग्रामीण रचना व समाज

## १ प्राचीन समाज

भारताच्या सांस्कृतिक इतिहासाचा आढावा घेता येथील संस्कृतीची व्यापकता लक्षात येते. प्राचीन काळ भारताच्या अस्मितेची किल्ली आहे, असे स्पष्ट होते. कालांतराने मूळ भारतीयांच्या अर्थशून्य झालेल्या चालीरीती व धार्मिक पद्धती अर्थपूर्ण होत्या याची खात्री पटते. परंतु काळाच्या ओघात भारतीयात कसा बदल होत गेला आणि त्याचे कोणते परिणाम घडले ते पहाणे आवश्यक ठरते.

भारतातील मूळ रहिवासी कोण होते ? त्यांची भाषा कोणती होती ? ते संस्कृत होते की, नाही याविषयी अद्यापही विद्वानात दुमत आहे. ऋग्वेद हे सर्वात जुने भारतीय इतिहासाचे वाङमयीन साधन प्रमाण मानले तर भारतातील आर्यांच्या आगमनापूर्वी दास व दस्यू नावाचे लोक असावेत हे निश्चित. हे लोक आर्यांच्यापेक्षा कितीतरी पटीने सुधारलेले होते. त्यांचा खेडेगावाशी फारसा संबंध नव्हता. ऋग्वेदाच्या व सिन्धू संस्कृतीच्या अभ्यासावरून हे स्पष्ट होते की, आर्यांच्या आगमनापूर्वी भारतात लोकसंख्या अल्प प्रमाणात होती. आर्यांनी दासांना शत्रू समजून त्यांचा पराभव केला, त्यांचे देव व संस्कृतीचा स्वीकार करून स्वतःस पवित्र बनविले. आर्यांच्या आगमनामुळे भारतीय संस्कृतीत फक्त बदलच झाला नाही तर अनेक वाईट पद्धती येथे सुरू करण्यात आल्या आहेत. कालांतराने देशाच्या लोकसंख्येत वाढ होऊं लागली. त्याचा परिणाम ग्रामीण रचना मोठ्या प्रमाणात होऊ लागली. आर्यांनी आपले वजन कायम राहावे म्हणून मूळ भारतीय संस्कृतीत बदल केला; व ग्रामीण रचना हेतुपुरस्सर करून आपला हेतू साधला आहे.

## २ प्राचीन ग्रामीण व्यवस्था

प्राचीन काळी या देशात प्रत्येक खेडे स्वावलंबी व स्वतंत्र होते. ते स्वतःचा कारभार स्थानिक लोकांकडून पहात असत. कालांतराने या देशावर परकीयांची आक्रमणे होत गेली. अनेक परकीयांनी या देशाला मनसोक्तपणे लुटले. या देशात आर्यांनी, मुसलमानांनी, इंग्रजांनी, शीखांनी, शक, कुशाण, इत्यादि लोकांनी राज्य केले. ते या देशाचे काही काळपर्यंत मालक झाले. याला आमच्या देशाची भिन्नता व विषमता कारण ठरली. परकियांना या देशाच्या जीवनाशी एकरूप व्हावे लागले. अनेक लोक या देशाच्या संस्कृतीत सामावले गेले. येथे अनेक भाषांचा वापर केला गेला. हे सर्व जरी घडले असले तरीपण या देशातील ग्रामीण समाज व त्याची रचना मात्र कायम राहिली आहे. हे या देशाचे वैशिष्टच आहे. ग्रामीण रचनेकडे व तेथील समाजाकडे बारकाईने पाहाता या मागे काही विशिष्ट हेतू असावा असे निश्चित वाटते. त्यामुळेच आजही आमचा भारतीय समाज विशिष्ट चाकोरीतून जाताना दिसतो आहे.

प्राचीन काळापासूनच आपल्या देशात खेडे हा प्रमुख घटक मानला आहे. आजही त्यास महत्व देण्यात येत आहे. देशाची संस्कृती, समाज, आर्थिक परिस्थिती व राजकारण सुधारावयाचे असेल तर ग्रामीण जनता सुधारली पाहिजे असा विचार अनंत काळापासून येथे स्वीकारण्यात आला आहे. कोणत्याही देशात वसती कसकशी होत असते. हे बऱ्याच अंशी त्या देशांच्या नैसर्गिक वैशिष्ट्यावरून ठरत असते. येथे मात्र नेमके हेच हेतुपुरस्सर साधले आहे. प्राचीन काळात आर्यांनी संपत्तीसाठी, शेतीसाठी, गाईसाठी, दस्यु लोकांचा संहार करून स्वतःला श्रेष्ठ ठरविले. इतकेच नाही तर त्या लोकाचा संहार करण्यामागचा त्यांचा वर्णद्वेश








प्रामुख्याने जाणवल्याशिवाय राहात नाही. भारतीय सामाजिक व्यवस्था वैशिष्टचपूर्ण आहे. समाजाची विभाग पाडून प्रत्येक बाबतीत वैशिष्टचता साधण्यात आली आहे. उच्च वर्णीय लोकांनी आपले वर्चस्व अनंत काळापर्यंत समाजावर कायम राहावे याची सोय करून ठेवली आहे.

### ३. नैसर्गिक हवेत कृत्रिम विषमता व ग्रामीण जनता

आपल्या देशाच्या ग्रामीण रचनेचे परीक्षण केले असता ती वैशिष्टचपूर्ण आहे याची जाणीव होते. सर्वसाधारणतः महाराष्ट्राच्या संपूर्ण खेडचात हिंदूनी अस्पृश्य मानलेला समाज म्हणजे महार, मांग, चांभार, इत्यादि जमातीचे लोक राहातात. अस्पृश्य गणल्या जाणाऱ्या लोकांची वस्ती खेडेगांवात बहुतेक पूर्व दिशेला करविली आहे. बाकीचा सुवर्ण समजल्या जाणाऱ्या समाजाची वसती पश्चिमेकडे आहे. सर्वसाधारणतः नैसर्गिक हवा पश्चिम ते पूर्व वहात असते. पश्चिमेकडून वहात येत असलेली नैसर्गिक शुद्ध हवा प्रथमतः स्पृश्य लोकांना मिळावी याउलट राहिलेली व अशुद्ध झालेली हवा पूर्वेकडील अस्पृश्यांना देण्याची व्यवस्था केली गेली आहे. स्पृश्य वर्ग उच्च वर्णीय आहे इतकेच नाही तर तो शुद्ध हवेचा मालक आहे, व अस्पृश्य हीन आहेत. म्हणून त्यांना अशुद्ध हवा देणे योग्य आहे. अशा प्रकारच्या विषमतेच्या विचारावर ग्रामीण रचना करण्यात आली पाहिजे. ग्रामीण रचना करताना भविष्य काळाचा विचार करण्यात आला आहे. कालांतराने समाज सुधारला आणि अस्पृश्य वर्ग आपल्या हक्कासाठी झगडू लागला तरी पण न कळत का होईना आपले वर्चस्व कायम राहावे. अशा प्रकारची तरतूद करून ठेवली आहे.

### ४. देवता व बळी पद्धत

प्राचीन काळापासूनच आर्य व अनार्य यांचे देव, धर्म व पूजापद्धती वेगळी होती. अनार्यांचे देव आर्यांच्या देवापेक्षा शुद्ध व उच्च समजण्यात येत असावेत. अनार्य नंदी, शिव, भवानी, नद्या, अंबा, वृक्ष इत्यादि देवांची पूजा करीत असत. अनार्य मूर्तिपूजक होते. कालांतराने या लोकांना मागासलेले व अस्पृश्य समजण्यात येऊ लागले. त्यांचे देव आर्यांनी व उच्च वर्णीयांनी बळकावले. त्यामुळे आज स्पृश्यवर्ग नंदी शिव भवानी, वृक्ष इत्यादि देवांची पूजा करताना दिसत आहे. या देवाच्या देवळात आज अस्पृश्यांना प्रवेश दिला जात नाही. अस्पृश्यांचे देव बळकावून त्यांना मरीआई, मसाई, मसोबा, खंडोबा इत्यादि देव दिले आहेत. या देवांचा आहार मोठा असतो. मांसाहार या देवाचा प्रमुख आहार असतो. पूर्वी आर्य जमातीही मांसाहार करीत असे. कालांतराने मांसाहार अशुद्ध मानून आर्यांनी शुद्धता व पवित्रता आपल्या वाटचाला घेतली आहे. अस्पृश्यांचे देव बहुतेक गावाच्या पूर्व दिशेला व वेशीच्या बाहेर असतात. गावात देवीची साथ आली असता तिला संतुष्ट करून घेण्याची पद्धत आजही भारतीय उच्च व अस्पृश्य समाजात आहे. देवीच्या साथीतून गावाला वाचविण्यासाठी मसाई व मरीआईला बळी देऊन संतुष्ट करण्याचे कार्य महार किंवा मांग या अस्पृश्यवर्गाचे समजले जाते. अस्पृश्यांना दिल्या गेलेल्या देवाचा आहार मोठा असतो. म्हणून अशा प्रकारचे देव त्यांना योग्य आहेत अशी स्पृश्यांची विषमतेची भावना आहे. मांसाहार या देवांना देण्यासाठी ज्या प्राण्यांना बळी द्यावयाचा असतो तो अस्पृश्यानी हिंसेचे पातक अस्पृश्यावर लादण्याचा हा एक डावच नाही तर जन्मोजन्मी अस्पृश्य वर्गाने अस्पृश्य राहावे याची सोय या देवता अस्पृश्यांना देण्यामागे आहेत. हिंदू धर्म पद्धतीनुसार पूर्व जन्मीच्या पापामुळे अस्पृश्य होतो अशी समजूत आहे. अस्पृश्यांनी देवाना संतुष्ट करण्यासाठी बळी दिलेले असतात आणि त्यामुळे पापाचे खापर त्यांच्या डोक्यावर फोडले जाते. त्यामुळे पिढचा न पिढचा ते पाप करीत राहावे व अस्पृश्य राहावेत अशी ही धार्मिक योजना स्पृश्य वर्गीयानीं अस्पृश्यांना दिली आहे. हिन्दू धर्मातील महार जमात आज मोठचा प्रमाणावर बुद्ध धर्मात गेल्यामुळे अशा देवतांची पूजा करण्याचे सोडले असले तरी पण आजही महाराष्ट्रात मांग, चांभार, वडार, ढोर इत्यादि जमाती त्याच देवांची पूजा करतात.







गावात आलेली देवीची साथ विशिष्ट कार्यक्रम करून घालविण्यात येते. मसाई किंवा मरीआईला बळी देऊन संतुष्ट केले जाते. "पोतराजा" नेच देवीला संतुष्ट करावयाचे असते. या सणानिमित्ताने रेड्याचा बळी द्यावयाचा असतो तो बळी अस्पृश्य समाजातील माणसाने सुऱ्याच्या एकाच झटक्याने करावयाचा असतो. तसे करता आले नाही तर गावाचा पाटील त्याचाच बळी घेतो, व दुसऱ्या अस्पृश्याला या कार्यासाठी उभे केले जाते. बळी दिलेल्या रेड्याच्या पोटातील आतडी त्या माणसाने बाहेर काढावी. त्यातील शेण किंवा घाण काढून टोपल्यात भरावे. आतडी स्वतःच्या गळ्यात घालून व शेणाने भरलेले टोपले डोक्यावर घेतल्यानंतर त्या माणसाला नग्न करण्यात येते. त्याच्या तोंडात काळीज व फुप्फुसे देण्यात येतात. त्या पत्नीचे कुंकू पुसण्यात येते. अशा अवस्थेत त्या माणसाला वाजंत्री लावून गावांच्या चारी दिशेला फिरवून ते शेण चारी दिशेला टाकविण्यात येते. त्यामुळे देवीची साथ गावाबाहेर जाते, अशी खुळी समजूत आहे. पोतराज देवीच्या संबंधात गाणी गात असतो :

आई ग मरी माता, तुझा शेंदराचा ओटा
बुचड्यात लिंबु टोचा आई ग मरी माता
धूरपता माय तुला रेड्याचा निवेद
सव्वा खंडीच भोजन ग धूरपता माय.

या कार्यक्रमास "आई बोळावणे असे म्हणतात" अस्पृश्यांच्या देवता त्यांच्याप्रमाणेच गावाच्या करदोड्या बाहेर असतात. भारतीय समाजाने देव धर्माचा काळजीपूर्वक अभ्यास केला तर हे स्पष्ट होते की, स्पृश्यांनी काही मोठ्या माणसांना देव किंवा अवतार मानून सर्वसामान्य माणसाला बुद्धिवादापासून व प्रज्ञेपासून भ्रष्ट केले आहे.

## ग्रामीण व्यवसाय

वैदिक काळापासूनच भारतात उच्च नीचता पाळण्यात येत आहे. पुढे लोकसंख्येच्या वाढीमुळे श्रमविभागणीच्या तत्त्वासाठी समाज विभागण्यात आला असे सांगितले गेले. खऱ्या अर्थाने समाज श्रम विभागणीसाठी विभागला गेला नाही. स्पृश्यांनी आपले सामाजिक व आर्थिक वर्चस्व समाजावर कायम राहावे यासाठी समाजविभागणी केली आहे. हे भारतीय समाजाच्या वेगवेगळ्या व्यवसायावरून स्पष्ट होते. काळाच्या ओघात वेगवेगळ्या जाती विशिष्ट व्यवसाय करू लागल्यामुळे जो जातिव्यवसाय होऊन बसला होता, तोही जन्माधिष्ठित ठरला गेला. ब्राह्मण, क्षत्रिय, व वैश्य यांनी शेती, व्यापार, सैन्यात नोकरी, हिशोबनीसाचा, संदेशवाहकांचा असे कोणतेही व्यवसाय करण्याची सोय केली आहे. याउलट अस्पृश्यांनी विशिष्ट व्यवसायच करावेत असा दंड केला. अस्पृश्यांच्या धंद्यावर निर्बंध घालण्यामागेसुद्धा विशिष्ट दृष्टिकोन साधला आहे. या लोकांच्या वस्तीचा व अन्नाचा प्रश्न सोडविण्याची तरतूद हीनपद्धतीने केली आहे. सकाळ ते सायंकाळी घुंगराची काठी घेऊन घरोघर भाकरी मागून कुटुंबास अन्न पुरवावे, व मृत माणसाचे कपडे घालावे अशी ही दरिद्री योजना यांच्यासाठीच केली गेली. हरॉल्ड आर इस्कस या लेखकाच्या India's Ex- Untouchables या ग्रंथातील उतारा पूरक ठरेल :

"Our people's duty was to take away dead carcasses. They were not paid for this work and lad to eat the flesh. This system is still found now, where people live on dead carcasses. They must also go to the houses of the the caste Hindus and ask for bread, and the caste Hindus would throw out bread, half- chewed with the flesh and eat it."

श्रमविभागणीच्या तत्वामुळे आर्थिक परिस्थिती सुधारण्यास मदत होते. ग्रामीण भागातील अस्पृश्य समाजातील स्त्रिया वेगवेगळे काम करताना दिसतात. काम करण्यामागे त्यांचा उपजीविकेचा जरी उद्देश असला तरी अप्रत्यक्ष रीत्या देशाच्या आर्थिक परिस्थितीत सुधारणा होण्यास मदत झाली असे मानावे लागते. या उलट स्पृश्य वर्गीय स्त्रिया आजही ग्रामीण मालकीचेच काम करतात. त्यामुळे












काही प्रमाणात का होईना त्यांच्याकडून आर्थिक मदत होत नाहीं. यावेळी समाजवादाविषयी विचार करताना आर्थिक समता प्रस्थापित करण्याची आवश्यकता वाटते. व बर्नार्डशॉ यांनी

" The Intelligent women's Guide to Socialism and Capitalism " या ग्रंथात मांडलेले विचार आठवतात.

" What the Socialists say is that none of these plans will work well, and that the only satisfactory plan is to give everybody an equal share no matter what sort of a person she is, or how old she is, or what sort of work she does or who or what her father was "

कालांतरानी अस्पृश्यासाठी बलुतेदाराची पद्धत अवलंबिण्यात आली होती व आजही महाराष्ट्रातील ग्रामीण भागात चालत आहे. महार, मांग, चांभार, धोबी, सुतार, लोहार इत्यादि अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या समाजाला त्यांनी केलेल्या कामाचा मोबदला पैशाच्या स्वरूपात न देता वर्षाच्या शेवटी धान्याच्या रूपात देण्याची ती पद्धत आहे. कामाच्या मोबदल्यात जे धान्य देण्यात येते. तेही निश्चित करण्यात आलेले नसते. मालकाने जे दिले असेल त्यातच बलुतेदाराने समाधान मानले पाहिजे. असा दंडक असतो. आपल्या कामाचा मोबदला विशिष्ट प्रमाणात मिळावा अशी मागणी बलुतेदार करू शकत नाही. अशा प्रकारची सोय करणे म्हणजे अस्पृश्य समाजाची आर्थिक बाजू बळकट होऊ नये हा हेतू असतो.

व्यवसायपद्धतीमुळे आर्थिक परिस्थिती न सुधारता भारतीय समाज वेगवेगळ्या जातीत विभागण्यास मोठी मदत झाली आहे. जाती व्यवस्थेमुळे समाजात भिन्नता व विषमता निर्माण झाली आहे. समाज व्यवस्था दुभंगली व त्यामुळे देशाच्या ऐक्यास अडथळा निर्माण झाला. त्यामुळे अनेक वेळा भारतीयांना पारतंत्र्यात राहावे लागले आहे.

## आदरातिथ्याच्या पद्धती

ग्रामीण समाज आदरातिथ्यासाठी ज्या पद्धतीचा उपयोग करतो त्यातही बरेचसे अंतर आहे. अस्पृश्य गणल्या जाणाऱ्या वर्गाच्या एकमेकाविषयी आदर व स्वागत करण्यासाठी काही पद्धती आहेत. स्पृश्य वर्ग नमस्कार, रामराम, जयरामजीकी, इत्यादि शब्दानी इतरांचे स्वागत करतो, व खुशाली विचारतो. अस्पृश्य वर्गाला अशा प्रकारच्या शब्दानी स्वागत करता येत नाही. त्यांनी जोहार, फुरमांग, व शरनार्थ अशा प्रकारचेच शब्द स्वागतांसाठी व आदर व्यक्त करण्यासाठी वापरावेत असा नियम आहे. उच्च वर्गातील ब्राह्मण, मराठा, मारवाडी, देशमुख, वाणी इत्यादि समाजातील गुरव काही कामानिमित्ताने महारवाड्यात, मांगवाड्यात, किंवा चांभारवाड्यात आला तर तेथील अस्पृश्य स्त्री त्यांना " कारभारी " म्हणून संबोधतात, त्याला मोठ्या आदराने वाकून 'पाया पडते' अशा शब्दाने आदर दाखवतात. या उलट मागास वर्गीय समाजातील पुरुष उच्च वर्गीय लोकांच्या वाड्यात गेला तर त्याला मात्र दूर राहूनच काम करून घ्यावे लागते. तो तेथील स्त्रियांना " माय " म्हणून त्यांचा आदर करतो. समाजातील असे अंतर वर्षानुवर्षे कायम आहे त्यामुळे देशामध्ये समतेसाठी केले जात असलेले प्रयत्न अल्प पडतात असे वाटते.

## नैसर्गिक पाणी व समाज

ग्रामीण भागात प्रामुख्याने ओढे, होळ, नद्या, यांच्या पाण्याचा उपयोग केला जातो. अस्पृश्य समाजाची आर्थिक परिस्थिती बरी नसल्याकारणाने त्यांना आड किंवा विहीर खोदून पिण्याच्यापाण्याचा प्रश्न सोडविता आला नाही. त्यामुळे नैसर्गिक वहाणाऱ्या पाण्यावरच त्यांना अवलंबून राहाणे भाग पडले. उताराकडील पाणी अस्पृश्यानी घ्यावे, त्याचाच उपयोग त्यांनी करावा असा दंड करण्यात आला आहे. वरच्या भागाकडे गावातील स्पृश्य लोकांनी पाणी घ्यावे. उताराचे अशुद्ध पाणी अस्पृश्यांनी घ्यावे. यामागे अशी विषमतेची भूमिका आहे. स्पृश्यानी उताराकडे पाणी भरणे त्यांचा

अवमान समजला जातो. पाण्याच्या ठिकाणीही चढ उतार समाज-संबंधात साधला आहे.

मानवी समाजाचे परीक्षण केले असता समाज हा क्रियाशील असलेला आढळतो. क्रिया समाजाच्या प्रत्येक अवस्थेत चालू असते. समाजाच्या प्रत्येक व्यक्तीचे व गटाचे विचार व कल्पना सातत्याने बदलताना दिसतात. कधी कधी घटनांचे अर्थ बदलतात. विचारात व कल्पनात बदल करून माणूस आपले जीवन सुखकर करण्याचा प्रयत्न करीत असतो. येथे मात्र या बाबतीत समानता साधली गेली नाही.

## ग्रामीण जनता व समाजवाद

आज आपल्या देशात समाजवादाची भाषा बड्या नेत्यांच्या तोंडून ऐकावयास मिळत आहे. खेड्या-पासून ते देशाच्या राजधानीपर्यंत समाजवादा-विषयी चर्चा सुरू आहे. खऱ्या अर्थानी समाजवाद आणावयाचा असेल व हरित क्रांती यशस्वी करावयाची असेल तर ग्रामीण भागात समतेची पताका फडकावली पाहिजे. बहुतेक जनता ग्रामीण भागात राहात आहे, याची जाणीव आम्हास असली पाहिजे. " बहुतांचे बहुत हित " हे ध्येय खऱ्या अर्थाने साधले गेले पाहिजे. समतेचा ध्वज भारतीय लोकशाहीला पोषक असे वातावरण निर्माण करील. लोकशाही, समाजवाद व हरित क्रांती खऱ्या अर्थाने यशस्वी करावयाची असेल तर समान व सामुदाईक नेतृत्वाची गरज आज देशाला आहे. आजही खेडो-पाडी विषमता टिकून आहे. खेडोपाडी दलितांचा वर्ग हादरला जात आहे. याला कारण ग्रामीण दलित जनतेचे आर्थिक जीवन गावावर अवलंबून आहे. समतेसाठी व हक्कासाठी त्यांनी उठाव केला तर त्यांच्यावर अन्याय केले जातात. शासनाचे कायदे अद्याप खेड्याच्या वेशीत शिरलेले नाहीत. ग्रामीण भागात रूढींचा व परंपरेचा कायदा राजरोसपणे राज्य करताना दिसतो आहे. ग्रामीण रचनेत बदल व समाज सुधारावयाचा असेल तर आमच्या नेत्यानी खेड्याची वाट धरली पाहिजे. समाजसुधारकांची गरज आहे. समाजसुधारक सुधारणेसाठी ज्या योजना आखतील त्या यशस्वी करण्यासाठी सरकारने त्यांना पूरक असे कायदे करणे योग्य ठरेल. खेड्यातील जनतेचा गृहनिर्माण संस्थेमार्फत प्रश्न सोडविता आला पाहिजे. समाजवाद व समता आणण्यासाठी अनक प्रयोग केले जातात. सहकार चळवळ हा प्रयोग उच्च दर्जाचा ठरला आहे. अशा चळवळीत आर्थिक दृष्टचा ग्रामीण भागात मागासलेले असतील त्यांना सहकारी संस्थात सभासद करून घेतले गेले पाहिजेत. सभासदांच्या फीचे बन्धन त्यांना नसावे त्यामुळे आपोआपच संपत्तीची समान विभागणी होण्यास मदत होईल. पडित जमिनी भूमिहिनांना देऊन त्यांचा आर्थिक प्रश्न सोडविता आला पाहिजे. शेतीवर योग्य प्रमाणात शिलिंग बसविणे योग्य आहे. धर्माला विशेष महत्त्व न देता शिक्षणाचा प्रसार खेड्यातील झोपडीपर्यंत केला गेला पाहिजे. राजकीय क्षेत्रात नातलगांचा व जातीचा गोतावळा वाढणार नाही याची काळजी घेतली गेली पाहिजे. बदलत्या परिस्थितीप्रमाणे आम्ही समाज बदलला पाहिजे. तेव्हा कोठे आम्ही समतेच्या चंद्रावर पोहचू, व समाजवादाकडे वाटचाल करू; नसता हे एक रंगेल स्वप्न ठरेल.








प्रा. सु. वा. बखले

# 'सैश्वरवाद' म्हणजे काय ?

मनुष्य जेव्हा स्वतःला 'सैश्वरवादी' – अथवा 'निरीश्वरवादी' – समजतो तेव्हा ह्या शब्दांचे नेमके काय अर्थ होतात आणि त्यात इतर कोणते अर्थ अभिप्रेत असतात ह्याचा विचार तो सहसा करीत नसतो. 'मी सैश्वरवादी आहे' असे तो केवळ **म्हणत** असतो परंतु तो मुळात तसा नाही ही शक्यता असू शकते. कारण 'सैश्वरवाद' ह्याचा स्पष्ट अर्थ त्याला माहित नसतो. म्हणून येथे केवळ ह्या शब्दाचा अर्थ काय होऊ शकतो ह्याचाच विचार करावयाचा आहे.

'मी सैश्वरवादी आहे' असे जेव्हा मनुष्य म्हणत असतो तेव्हा सर्वसामान्यपणे 'माझा परमेश्वराच्या अस्तित्वावर **विश्वास** आहे' अथवा 'मी परमेश्वराचे अस्तित्व **मानतो**' अशी अथवा ह्या अर्थाची इतर विधाने तो करीत असतो. प्रश्न असा आहे की कोणत्याही वस्तूवर– मग ती परमेश्वर असो की इतर असो– 'विश्वास' असणे म्हणजे नेमके काय ? 'माझा **विश्वास** आहे की फळा काळा आहे' आणि मला **माहित** आहे की फळा काळा आहे' ह्या विधानांचे अर्थ सारखेच होतात काय ? जेव्हा 'फळा काळा आहे ह्यावर माझा विश्वास आहे' असे मनुष्य म्हणतो तेव्हा हा विश्वास चुकीचा अथवा असत्य राहू शकतो, निदान तशी तार्किक शक्यता असते, असे ध्वनित होते. फळा काळा आहे असे **वाटू** शकते, तसा **आभास** निर्माण होऊ शकतो आणि म्हणून विश्वास हा निश्चित राहीलच ह्याविषयी संशय उत्पन्न होऊ शकतो. परंतु जेव्हा 'फळा काळा आहे हे मला माहीत आहे' असे मनुष्य म्हणतो तेव्हा ते ज्ञान अथवा अनुभव चुकीचे अथवा असत्य राहू शकत नाही, तशी तार्किक शक्यताही नाही, असे ध्वनित होते. थोडक्यात ज्ञानाचे एक लक्षण निश्चितता आहे आणि विश्वासाचे ते लक्षण नसू शकते असे आपण म्हणू शकतो. अर्थात विश्वास हा सत्य **राहू शकतो अथवा होऊ शकतो** हे ह्या ठिकाणी नाकारले नाही. तो फक्त **नेहमीच** सत्य असतो, जे ज्ञानाचे लक्षण आहे, हे येथे नाकारले आहे. तसेच विश्वास हा अधिकाधिक सत्यही राहू शकतो हेही या ठिकाणी नाकारले नाही.

म्हणून 'परमेश्वराच्या अस्तित्वावर माझा विश्वास आहे' असे जेव्हा मनुष्य म्हणतो तेव्हा 'फळा काला आहे ह्यावर माझा विश्वास आहे' ह्या विधानासारखाच त्याचा अर्थ करावा लागेल आणि 'परमेश्वर आहे हे मला माहित आहे' ह्या विधानाचा अर्थहि' फळा काला आहे हे मला माहित आहे' ह्या विधानासारखा करावा लागेल. सैश्वरवादी मनुष्य वरील विधानांपैकी 'परमेश्वराच्या अस्तित्वावर माझा विश्वास आहे' हेच विधान मान्य करीत असतो. आणि असे विधान मान्य करीत असताना 'परमेश्वराच्या अस्तित्वावर माझा विश्वास आहे' आणि 'परमेश्वराचे अस्तित्व मला माहित आहे' ह्या विधानांमध्ये तो फरक करीत असतो. परमेश्वराच्या अस्तित्वावरील 'विश्वास' चूक अथवा असत्य असू शकतो, परंतु परमेश्वराच्या अस्तित्वाचे 'ज्ञान' चूक अथवा असत्य राहू शकत नाही.

आता, 'परमेश्वराच्या अस्तित्वावर विश्वास आहे' असे म्हणत असताना मनुष्याला कोणता अर्थ अभिप्रेत असतो हे ठरवायचे आहे. ह्या विधानात खालील विधाने अभिप्रेत असली पाहिजेत. कारण जोपर्यंत ह्या विधानांवर विश्वास नसेल तोपर्यंत परमेश्वराच्या अस्तित्वावरही विश्वास आहे असे म्हणता येणार नाही. वरील विधानात अभिप्रेत असलेली विधाने अशी सांगता येतील –

१ 'परमेश्वर **सर्वश्रेष्ठ** आहे.'
२ 'परमेश्वर सृष्टीचा **कर्ता** आहे.'
३ 'मनुष्य आणि परमेश्वर ह्यात **द्वैत** आहे.'










# ‘ सैश्वरवाद ’ म्हणजे काय ?

वरील विधानांवर विश्वास ठेवण्यासाठी– अथवा राहण्यासाठी– त्या विधानांचा अर्थ स्पष्ट करावा लागेल. परंतु असे स्पष्टीकरण करण्यासाठी ह्या विधानातील ‘परमेश्वर’ ह्या शब्दाची व्याख्या करण्याची या ठिकाणी आवश्यकता नाही. आपण हे गृहीत धरू की ‘परमेश्वर’ म्हणजे काय हे मनुष्यास कळते, ज्याप्रमाणे ‘गोड’ म्हणजे काय कळते त्या प्रमाणे. त्या पदाची व्याख्या देण्याची आवश्यकता नसते, आणि दुसरे असे की ‘परमेश्वर’ ह्या पदाची व्याख्या कोणतीहि केली तरी एकूण युक्तिवादाला धोका पोहचत नाही. म्हणून त्या भरीस न पडता ‘परमेश्वर’ म्हणजे काय हे गृहीत धरून वरील विधानांचा अर्थ काय होईल ते पाहू.

‘परमेश्वर सर्वश्रेष्ठ आहे’ म्हणजे त्या व्यतिरिक्त कोणतीही वस्तु अथवा अवस्था श्रेष्ठ नाही असा अर्थ उघडच निघतो. आणि ह्यावर मनुष्याचा विश्वास असला पाहिजे. परमेश्वराशिवाय इतर वस्तु राहू शकतात हेही उघड आहे, जसे, पैसा, अणु सत्य, मानवता वगैरे. ह्या सर्व गोष्टी परमेश्वरा-व्यतिरिक्त आहेत. परंतु त्यापैकी एकही परमेश्वरा-हून श्रेष्ठ नाही असा विश्वास असला पाहिजे. परंतु ‘श्रेष्ठ’ आहे की नाही हे ठरविण्याचा निकष कोणता राहू शकतो ह्याचाही आपण विचार केला पाहिजे. कारण परमेश्वर सर्वश्रेष्ठ आहे असे मनुष्य तोंडाने **म्हणत** राहील परंतु त्यावर त्याचा वास्तविक विश्वास आहे की नाही हा प्रश्न शिल्लकच राहील. अमुक एक गोष्ट दुसरीपेक्षा मनुष्याच्या जीवनात ‘श्रेष्ठ’ आहे की नाही हे ठरविण्यासाठी तो त्याच्या जीवनात त्या दोन गोष्टींपैकी **महत्त्व** कोणत्या गोष्टीला देतो हे ठरवावे लागेल. आणि हे ठरविण्यासाठी आपल्याला हा निकष देता येईल की मनुष्याच्या जीवनात दोन गोष्टींमध्ये **‘संघर्ष’** उत्पन्न झाल्यास मनुष्य कोणत्या गोष्टीचा स्वीकार करतो ह्यावर तो कोणत्या गोष्टीला महत्त्व देतो हे अवलंबून राहील. ज्यांच्या जीवनात पैसा सर्वश्रेष्ठ असतो त्यांच्या जीवनात पैसा आणि इतर कोणतीही वस्तु ह्यात संघर्ष उत्पन्न झाल्यास ते पैशाचाच स्वीकार करतात, नव्हे, पैसा सर्वश्रेष्ठ जर ते मानत असतील तर तसा स्वीकार त्यानी करावयास पाहिज. हाच निकष सत्य, मानवता, अणु वगैरे वस्तूंसंबंधी लावता येईल. तसेच परमेश्वराच्या संबंधातही तो लावता येईल. म्हणजे जर मनुष्याच्या जीवनात परमेश्वर आणि इतर वस्तु- मग ती सत्य असो, की अणु असो, पैसा असो की मानवता असो, की इतर कोणतीही असो– ह्यात संघर्ष येईल तर त्याने परमेश्वराचाच स्वीकार करावयास पाहिजे असे म्हणावे लागेल. ‘परमेश्वर सर्वश्रेष्ठ आहे’ असे म्हणत असताना वरील अर्थ त्यात अभिप्रेत आहे. आणि ‘परमेश्वर’ म्हणजे ‘अणु’, अथवा ‘मानवता’, अथवा ‘सत्य’ अथवा ‘पैसा’ असा चुकीचा अर्थ ‘परमेश्वर’ ह्या पदाचा केला तरीहि ‘श्रेष्ठ’त्वाचा मूळ निकष हा अबाधित राहील.

२. सैश्वरवादी मनुष्याला दुसरेही विधान मान्य असले पाहिजे. ‘परमेश्वर सृष्टीचा **कर्ता** आहे’ हे विधान मान्य नसलेला मनुष्य सैश्वरवादी आहे असे म्हणण्यात विसंगती निर्माण होईल. ह्या ठिकाणी ‘परमेश्वर सृष्टीचे **कारण** आहे’ हे विधान, ‘परमेश्वर सृष्टीचा **कर्ता** आहे’ असे म्हणत असताना, अभिप्रेत नाही. कारण उघडच ‘कारण’ व ‘कर्ता’ ह्यात भेद आहे. शास्त्रज्ञ समजतात त्यानुसार अणु सृष्टीचे ‘कारण’ आहे परंतु अणु सृष्टीचा ‘कर्ता’ आहे असा अर्थ त्यातून निघत नाही. म्हणूनच ‘परमेश्वर सृष्टीचा कर्ता आहे’ आणि ‘अणु सृष्टीचे कारण आहे’ ही विधाने परस्पर विसंगत नाहीत. कारण एकादा शास्त्रज्ञ दोन्हीही विधाने सुसंगतीने एकाच वेळी मान्य करू शकतो. आणि तसे केल्यास तो शास्त्रज्ञ असूनही सैश्वरवादी आहे असे तो म्हणू शकतो. अर्थातच, ‘कर्ता’ आहे असे म्हटल्याबरोबर सृष्टीच्या निर्मितीमागील त्याचा हेतु काय ? तो हेतु आपल्याला कसा समजू शकतो ?, हेतु समजू शकतो असे गृहीत धरल्यास समजलेला हेतु आणि परमेश्वराच्या मनात असलेला वास्तविक हेतु ह्यात साम्य आहे की भेद आहे हे कसे ठरविता येईल ? ह्या प्रकारचे महत्त्वाचे प्रश्न जरी उपस्थित होत असले, तरी त्यांचा ह्या ठिकाणी विचार करण्याची








आवश्यकता नाही. कारण हेतु आहे किंवा नाही ह्यावर परमेश्वर सृष्टीचा कर्ता आहे किंवा नाही हे अवलंबून नाही. हेतु कोणताच नाही असे गृहीत धरले, अथवा म्हटले, तरीही परमेश्वर सृष्टीचा कर्ता आहे असे म्हणता येईल, आणि तसे म्हणत असताना कोणतीही विसंगती निर्माण होणार नाही.

३. 'मनुष्य आणि परमेश्वर ह्यात द्वैत आहे' ह्या विधानाचा अर्थ उघड आहे. आणि तो असा की मनुष्य मनुष्य आहे आणि परमेश्वर परमेश्वर आहे. कितीही प्रयत्न केला तरी मनुष्य मनुष्य असताना परमेश्वर होऊ शकत नाही अथवा परमेश्वर परमेश्वर असताना मनुष्य होऊ शकत नाही. मनुष्य परमेश्वराजवळ जाऊ शकेल, परमेश्वराचे दर्शन घेऊ शकेल, परंतु परमेश्वर होऊ शकणार नाही. एका अर्थाने परमेश्वरासारखा देखील तो होऊ शकेल, परंतु 'परमेश्वरासारखा' होणे आणि 'परमेश्वर' होणे ह्यात महदंतर आहे. तसेच परमेश्वर मनुष्य होऊ शकत नाही. अवतारांच्या उदाहरणांवरून परमेश्वर मनुष्य होतो असे म्हणता येणार नाही. कारण अवतार जेव्हा अवतार असतात, म्हणजे मनुष्य असतात, तेव्हा ते परमेश्वर नसतात असे म्हटल्यास त्याला आधार देता येईल. ( जसे : राम, कृष्ण ). तेव्हा मनुष्य आणि परमेश्वर ह्यात द्वैत आहे, ते एकच नाहीत. त्यांच्या स्वरूपात भेद आहे, त्यांच्या कार्यक्षमतेत भेद आहे. वास्तविक सर्वच बाबतीत भेद आहे हे येथे विस्ताराने स्पष्ट करण्याची आवश्यकता नाही. अशी एकही बाब नाही. ज्यात मनुष्य आणि परमेश्वर ह्यात साम्य आहे. 'परमेश्वर **अस्तित्वात** आहे' आणि 'मनुष्य **अस्तित्वात** आहे' ही विधाने मान्य केल्यास 'अस्तित्वाच्या बाबतीत' साम्य आहे असे जर म्हटले तर ते चुकीचे होईल. कारण 'अस्तित्व' ह्याचा अर्थ दोन्ही विधानात एकच होऊ शकत नाही. दोन्ही विधानातील 'अस्तित्व' हे भिन्न 'प्रकारचे' आहे, भिन्न 'कोटीचे' आहे असे म्हणता येईल आणि तसे म्हटल्यास विसंगती निर्माण होणार नाही. कारण वस्तूचे स्वरूप जसे असेल त्यावरून तिच्या 'अस्तित्वाचा' अर्थ करावा लागेल, तो तसा करताही येईल. परमेश्वर आणि मनुष्य एकाच प्रकारच्या वस्तु नसल्याने– कारण त्यात द्वैत आहे– त्यांच्या बाबतीत वापरलेला 'अस्तित्व' हा शब्द एकाच अर्थाने वापरल्यास तार्किक दोष होईल; म्हणून वरील दोन विधानांच्या साह्याने अस्तित्वाच्या बाबतीत दर्शविलेले साम्यही तार्किक दृष्ट्या सदोष आहे असे म्हणता येईल.

वरील तिनीही विधाने ज्याला मान्य असतील, म्हणजेच त्यांच्यावर ज्याचा विश्वास असेल, तो मनुष्य सैश्वरवादी आहे असे म्हणता येईल. मनुष्य स्वतःला सैश्वरवादी समजत असताना वरीलपैकी कोणतेही अथवा सर्व विधाने मान्य नसणे, म्हणजे त्यावर विश्वास नसणे, विसंगती निर्माण करील; म्हणूनच 'परमेश्वराच्या अस्तित्वावर विश्वास आहे' असे म्हणणे म्हणजेच वरील तीन विधानांवर विश्वास असणे कारण त्या विधानात वरील तीनही विधाने अभिप्रेत आहेत.

---










श्री. सुरेश र. देशपांडे

# " रा. ब., द. ब. पारसनीस "

## महाराष्ट्राचे एक थोर इतिहासकार

महाराष्ट्रात विसाव्या शतकाच्या सुरवातीस मराठ्यांच्या इतिहासावर संशोधन–लेखन करणारी जी थोडी थोर माणसे आपल्याला आढळतात, त्यात कै. रा. ब. दत्तात्रय बळवंत पारसनीस ह्यांना एक आगळे आणि वैशिष्ट्यपूर्ण स्थान आहे. पारसनीसांनी खरे, राजवाडे, सरदेसाई ह्याच्यापूर्वी इतिहास–लेखन–संशोधनास सुरवात केलीच; पण त्यानी केवळ ऐतिहासिक कागदपत्रांच्या संपादनात किंवा इतिहास पुस्तक–लेखनात समाधान न मानता वस्तुसंग्रहालयासारखी अभिनवकल्पना मनाशी बाळगून त्याकरिता आपले सर्व आयुष्य वेचले. इतिहाससंशोधन–लेखनाबरोबरच जुन्या, मौल्यवान, दुर्मिळ व ऐतिहासिकदृष्टचा महत्त्वाच्या अशा अनेक वस्तू त्यांनी आपल्या संग्रही जमविल्या. सातारा येथील 'पारसनीस म्यूझियम' व डेक्कन कॉलेजमधील 'पारसनीस संग्रह' ही त्यांची चिरस्थायी स्मारके होत. मराठ्यांच्या इतिहासावर संशोधन करणाऱ्या विद्यार्थ्याला ऐतिहासिक कागदपत्रांची सोय व्हावी म्हणून अद्ययावत ग्रंथालयाने युक्त असे संग्रहालय हे पारसनीसांचे स्वप्न होते; पण त्यांच्या अकाली मृत्यूमुळे ते पूर्ण झाले नाही.

पारसनीस हे मूळचे मलवडी (तालुका माण) चे. मलवडीच्या घाटग्यांच्या पदरी पारसनीसांचे पूर्वज होते. पारसनीसांचे वडील बळवंतराव साताऱ्यास रेव्हेन्यू खात्यात नोकरीस होते. दिनांक २७ नोव्हेंबर, १८७० रोजी आजोळी बोरगाव येथे पारसनीसांचा जन्म झाला. लेखन–संशोधनाकडे पारसनीसांचे मन एवढे आकृष्ट झाले की इंग्रजी सातव्या इयत्तेतच त्यांनी शाळेस रामराम ठोकला. तत्पूर्वी विद्यार्थीदशेत त्यांनी १८८७ मध्ये 'सुभाष्य चंद्रिका' नावाचे १६ पृष्ठांचे एक हस्तलिखित काढले होते, पण दुर्दैवाने तोच पहिला व अखेरचा अंक ठरला. ह्यावेळी आठल्ये 'केरळ कोकिळ' मासिक चालवीत. त्यावरून पारसनीसांना 'महाराष्ट्र कोकिळ' मासिकाची कल्पना सुचली आणि त्याच वर्षी त्यांनी ती कार्यवाहितही आणली. ह्या १६ पृष्ठाच्या एक रुपया वार्षिक वर्गणी असणाऱ्या मासिकाला त्यावेळी दोन हजार वर्गणीदार लाभले, यावरूनच त्याची लोकप्रियता लक्षात येते.

थोरामोठ्यांची चरित्रे व ऐतिहासिक गोष्टी पारसनीसांनी ह्या मासिकाद्वारे प्रसिद्ध केल्या. ह्याच सुमारास 'कीर्ति मंदिर' हे पुस्तक अवघ्या वयाच्या १९ व्या वर्षी प्रसिद्ध करून पारसनीसांनी त्यावेळचे बडोद्याचे दिवाण सर टी. माधवराव ह्यांच्याकडून कौतुक करून घेतले. त्यांनी पारसनीसांना एक उत्तेजनपर पत्र लिहिले. 'महाराष्ट्र कोकिळ' १८९२ मध्ये बंद पडले. तरीही पारसनीसांचे नाव एक प्रथितयश, अभिनव तरुण लेखक म्हणून सर्व महाराष्ट्रास चांगलेच परिचित झाले होते.

मासिकाच्या व्यवसायामुळे साहजिकच त्यांच्या थोरामोठ्यांशी ओळखी होऊ लागल्या व ते सार्वजनिक कार्यात भाग घेऊ लागले. कॉंग्रेसच्या अधिवेशनास जावे, त्याचे वृत्तान्त प्रसिद्ध करावेत वगैरे उद्योगामुळे त्यांचा चाहता वर्ग वाढला. प्रसिद्ध कादंबरीकार हरि नारायण आपटे ह्यांच्याशी त्यांची मैत्री होती. त्यांच्यामुळेच त्यांनी 'वाक्पुष्पांजली' (१८८९)हा कविता संग्रह प्रसिद्ध केला. १८९१ च्या नागपूर कॉंग्रेस अधिवेशन प्रसंगी हरिभाऊंनी पारसनीसांची टिळकांशी 'महाराष्ट्र कोकिळचे' संपादक म्हणून ओळख करून दिली. टिळकांना त्यांचे कौतुक वाटले. लोकमान्यांनी त्यास पुण्यास भेटण्याचे निमंत्रण दिले व ते म्हणाले, 'चरित्रे, इतिहास व प्रवासवर्णने मराठीत कमी आहेत. तर त्याबद्दल जरूर प्रयत्न करावा. मी तुम्हास प्रकाशनाच्या कामी मदत करीन' टिळकांप्रमाणे

पारसनीसांचा गोखले, रानडे इत्यादी तत्कालीन थोर व्यक्तींशीही परिचय झाला. नागपूर अधिवेशनाचा वृत्तांत पारसनीसांनी 'भारत भाग्योदय' 'भारतराष्ट्रमहोत्सव' आदी वृत्तपत्रात लिहिला. त्यामुळे त्यास आणखी प्रसिद्धी मिळाली. न्या. रानडयांनी पारसनीसांना इतिहास विषयातच अधिक लक्ष घालण्याविषयी विनंती केली. एवढेच नव्हे, तर पुढे सरकारी कागदपत्र पाहण्यास परवानगी मिळवून देऊन त्यांच्या संशोधन कार्यास चालना दिली. पारसनीसांच्या टिळक, रानडे वगैरेशी वारंवार गाठी पडत. टिळकांनी १८९३ च्या 'केसरी'त 'उत्तर हिंदुस्थानातील प्रवास' ह्या शीर्षकाखाली पारसनीसांची लेखमाला प्रसिद्ध केली. आगरकरांना ही गोष्ट समजली. तेव्हा त्यांनी हरिभाऊ आपटयांकरवी पारसनीसास भेटीस बोलाविले. प्रत्यक्ष भेटीत आगरकरांनी पारसनीसास 'दक्षिण हिंदुस्थानातील प्रवास' ही लेखमाला सुधारक पत्रात लिहिण्यास सांगितले. पारसनीसांनी आलेली संधी वाया दवडली नाही. परंतु आगरकरांच्या मृत्यूमुळे व इतर काही अडचणीमुळे ती लेखमाला अर्धवटच राहिली. ह्या लेखमालेची हकीकत ज्यावेळी टिळकांना समजली त्यावेळी टिळक पारसनीसांना म्हणाले, "एकंदरीत तुम्ही साताराशाही मुत्सद्देगिरी लढविली म्हणावयाची, नानासाहेब पेशवे व रघुजी भोसले ह्यांचे भांडण झाले, त्यावेळी शाहूराजाने नानासाहेबास उत्तर हिंदुस्थान दिले व रघुजी भोसल्यास कर्नाटक दिले. त्याप्रमाणे तुम्ही वाटणी केली की काय? पण लक्षात ठेवा, आम्ही दोघेही पुणेकर आहोत, साताराच काबीज करून टाकू." ह्या उद्गारामुळे पारसनीसांचा उत्साह द्विगुणित झाला.

पुण्याच्या वसंत व्याख्यानमालेत झाशीच्या राणीसंबंधी अतिरंजित व असत्य माहिती सांगण्यात आली. त्याचा वृत्तांत "केसरी"त प्रसिद्ध झाला. ही गोष्ट लक्ष्मीबाईचे दत्तकपुत्र दामोदरपंत ह्यांनी टिळकांच्या निदर्शनास आणली. टिळकांनी दिलगिरी व्यक्त केली. ह्यासुमारास झाशी संस्थानचा संक्षिप्त इतिहास 'महाराष्ट्र कोकिळ'मध्ये प्रसिद्ध झाल्याचे टिळकांनी पाहिले होते. त्यांनी पारसनीसांना राणीचे चरित्र लिहिण्याचा आग्रह केला. पारसनीस सदर उद्योगास लागले, त्यांनी दामोदरपंतास पत्र लिहून राणीसंबंधी विस्तृत माहिती पाठविण्याविषयी विनंती केली. उपलब्ध होणारी सर्व माहिती स्फुट लेखांद्वारे 'महाराष्ट कोकिळा'त प्रसिद्ध करण्यात आली; शिवाय पारसनीसांनी तत्कालीन इतर कागदपत्रातून माहिती घेऊन चरित्राचा स्थूल आराखडा तयार केला. आगामी चरित्राचा टिळकांनी दिनांक ३ ऑक्टोबर, १८९३ च्या केसरीत अभिनंदनपर लेख लिहून गौरव केला. पुढे १८९४ च्या अखेरीस झाशीच्या राणीचे चरित्र प्रसिद्ध झाले. ह्यामुळे पारसनीसांना आणखी कीर्ति लाभली सत्तावन्नच्या संग्रामानंतर थोडयाच वर्षात प्रसिद्ध झालेले लक्ष्मीबाईचे हे चरित्र फारच लोकप्रिय झाले. अलीकडे त्याची हिंदी, कानडी व गुजरातीत भाषांतरे झाली आहेत. झाशीच्या लक्ष्मीबाईसंबंधी काही लिहावयाचे झाल्यास पारसनिसकृत झांशीचे चरित्र दुर्लक्षिता येणार नाही. या चरित्रानंतर पारसनीसांनी 'बुंदेलखंड प्रकरण,' 'अयोध्येचे नबाव', 'मुसलमानी अमदानीतले मराठे सरदार,' 'महापुरुष ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर यांचे चरित्र व पत्रव्यवहार,' 'बायजाबाई शिंदे यांचे चरित्र,' 'दिल्ली अथवा इंद्रप्रस्थ,' 'ए–ओ. ह्यूम,' 'पं. अयोध्यानाथ' इत्यादि अनेक पुस्तके प्रसिद्ध केली. प्रत्येक पुस्तकात पारसनिसांचे इतिहाससंशोधन क्षेत्रांतील अन्वेषण प्रत्ययास येते.

पारसनिसांनी १८९६ मध्ये 'भारत वर्ष' मासिक काढले. त्याचे १८९९ पर्यंत फक्त चोवीसच अंक निघाले. हे मासिक पुण्याच्या डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटीतर्फे प्रकाशित होत असे. एकूण चोवीस अंकात पारसनिसांनी पंतप्रतिनिधी बखर, होळकर, बुंदेले, वावडेकर व पानसे घराण्यांच्या कैफियती न्यायशास्त्री पंडितराव यांची बखर, शिवछत्रपतींची ९१ कलमी बखर व इतर लहान मोठे ऐतिहासिक लेख प्रसिद्ध केले. अशा प्रकारे 'भारत वर्षा'च्या'द्वारे त्यांनी आपल्या कार्याचा पाया घट्ट रोवला. एका बाजूला लेखन व्यवसाय करीत असता त्यांची सातारा आणि त्याच्या आसपासचा भाग, तसेच कोकण नि महा-








राष्ट्रातील अनेक खेडी धुंडाळून मिळतील ते कागदपत्र साम, दाम ... इत्यादी मार्गांनी हस्तगत केले. दिवसेंदिवस त्यांचा व्याप वाढत होता. त्यांना समाजकार्यातील अंग काढून घ्यावे लागले व सर्व लक्ष इतिहाससंशोधनात व तत्संबंधी पुरावे मिळविण्यातच केंद्रीभूत करावे लागले.

इतिहास लेखनाच्या निमित्ताने त्यांचे संबंध संस्थानिक, सरदार यांच्याशी येऊ लागले. काही संस्थानिकांनी आपल्या घराण्याचा इतिहास लिहावा म्हणून पारसनीसांना आपल्याकडील कागदपत्रे व द्रव्यसाहाय्य देऊ केले. अशाच एका मैत्रीच्या संबंधातून १९०२ मध्ये कोल्हापूरच्या शाहूमहाराजांबरोबर पारसनीसांना इंग्लंडला जाण्याची संधी लाभली. या प्रवासात महाराजांनी पारसनिसांच्या खाण्यापिण्याची इतकी काळजी घेतली की, पारसनीस म्हणत, " महाराज माझ्या जवळच्या आचाऱ्यास मुद्दाम बजावीत की, " मी आज पारसनीसांच्या बरोबर जेवणार आहे व एखादाच पदार्थ चाखून पाहात.' पारसनीसांनी इंग्लंडमध्येसुद्धा शाकाहार सोडला नाही. तिथे त्यांनी अनेक वस्तुसंग्रहालये पाहिली, अनेक दुर्मिळ वस्तू खरीदल्या, काही कागदपत्रे व जुनी छायाचित्रेही मिळविली. कदाचित् भावी वस्तुसंग्रहालयाची कल्पना त्यावेळी त्यांच्या मनात वास करीत असावी. भारतात परतल्यानंतर ते पुन्हा आपल्या लेखन–व्यवसायात मग्न झाले.

अस्सल ऐतिहासिक लेख, पत्रे, सनदा वगैरे प्रसिद्ध करण्याच्या हेतूने पारसनीसांनी १९०८ मध्ये ' इतिहास संग्रह ' हे मासिक काढले. यावेळी त्यांच्याजवळ कागदपत्रांचा संचयही मोठा झाला होता, शिवाय अनेक संस्थानिकांकडून कागदपत्रे येतच होती. सरकार-दरबारांतही यावेळी पारसनिसांचे चांगलेच वजन वाढले होते. याच अनुषंगात रानडे, किंकेड, मावजीशेट, वगैरेंसारख्या जिवलग मित्रांमुळे ब्रिटिश दरबारांतील एलीएनेशन रेकार्ड पहावयाची एकमेव संधी पारसनीसांना मिळाली. त्यामुळे उपलब्ध झालेले सर्व कागदपत्र सामान्य वाचकाला उमजतील अशा भाषेत संगतवाररीतीने ऐतिहासिक प्रकरणाद्वारे सादर करण्याचे त्यांनी योजिले. 'इतिहाससंग्रह' एकूण आठ वर्षं चालले. नाना फडणविसांचे मेणवली दप्तर व वाडकृत पेशवे दप्तराचे काही खंड हे या मासिकांतून प्रसिद्ध झालेले अत्यंत महत्त्वाचे कागदपत्र होत.

यानंतर पारसनिसांनी आपली सर्व शक्ति वस्तुसंग्रहालयाच्या स्थापनेकरिता खर्ची घालविण्याचे ठरविले. त्याप्रमाणे त्यांनी दिनांक ४–१२–१९१२ रोजी सरकारला एक पत्र लिहून वस्तुसंग्रहालयाची निकड व आपला संग्रह याविषयी माहिती कळविली. १९१४ मध्ये संग्रहालयास मान्यता मिळूनही हे काम काही वर्षे महायुद्धामुळे रेंगाळले. दरम्यान वस्तुसंग्रहालयाचे जुन्या चित्रांचा एक व जुन्या कागदपत्रांचा एक असे दोन स्वतंत्र भाग करण्याचे ठरले. त्याकरिता सरकारने नवीन इमारत बांधून दिली; व तीत दिनांक ३ नोव्हेंबर, १९२५ रोजी गव्हर्नर सर लेस्ली विल्सन यांच्याहस्ते वस्तुसंग्रहालयाचे उद्घाटन झाले. या संग्रहालयात त्यावेळी तीस हजार मराठी, चार हजार इंग्रजी कागद व दुर्मिळ असे तीन हजार ग्रंथ होते. ग्रंथात फ्रेंच, पोर्तुगीज भाषेतील तसेच इंग्रजी मान्यवर लेखकांचे इतिहासावरील ग्रंथ होते. हा संग्रह डेक्कन कॉलेज पुणे येथे पारसनीसांच्या मृत्यूनंतर हालविण्यात आला. पारसनीसांचा खाजगी चित्रसंग्रह व काही पुस्तके पारसनीस म्यूझीयम या नावाने प्रसिद्ध असून ती सातान्यास त्यांच्या बंगल्यात आहेत. त्यांत नाणी, कलाकुसरीच्या नमुनेदार वस्तू, जुनी हत्यारे व महादजी शिंदे, नाना फडणीस, प्रतापसिंह महाराज आदींची अस्सल चित्रे, आणि संभाजी, छत्रपती शिवाजी, शाहू महाराज, पेशवे–दरबार वगैरेंच्या अस्सल चित्रांची छायाचित्रे यांचे प्रेक्षणीय भांडार आहे, शिवाय कांग्रा, रजपूत, मुसलमान आदींच्या चित्रशैलीही तेथे पाहावयास मिळतात.

पारसनीसांनी कुणाचीही नोकरी अशी केली नाही. मावजी, आपटे व चार्लस किंकेड ह्या तीन मित्रांच्या मदतीने त्यांचे बडोदे, कोल्हापूर, सांगली, ग्वाल्हेर आदी संस्थानिकांशी, तसेच धनिकांशी व सरकार



अनुक्रमणिका






दरबारात चांगले वजन होते. लेखनाद्वारे त्यांनी जरी पैसा कमविला असला तरीसुद्धा त्यांच्या संग्रहालयास संस्थानिकांकडून फार मोठे द्रव्य-साहाय्य झाले.

पारसनीसाची राहणी सरदाराप्रमाणे ऐशआरामी होती; वृत्ती प्रेमळ आणि परोपकारक होती. गरीब मित्रांना व आप्तांना ते सढळ हाताने मदत करीत. ब्रिटिश सरकारने त्यांना १९१३ मध्ये ' रावबहादुरी देऊन त्यांचा बहुमान केला.

पारसनीसांचे तत्कालीन इतिहासकार खरे, राजवाडे, सरदेसाई, सरकार आदींशी संबंध मैत्रीचे होते. परंतु सरकार व सरदेसाई ह्यांनी पारसनी-सांच्या निधनानंतर त्यांच्यावर शितोडे उडविले; आणि पारसनीसांनी ग्वाल्हेरकरांना फसविले; प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियमला बरेच ऐतिहासिक साहित्य विकले किंवा किंकेडनी पारसनीसांचे ' The History of the Marathas ( 3 Volumes ) ह्या पुस्तकावर नाव घातले, वगैरे आरोप त्यांच्यावर केले. ग्वाल्हेरचे महाराज व पारसनीस तसेच सी. ए. किंकेड आणि पारसनीस ह्यांचा सर्व पत्रव्यवहार पाहिला असता वरील आरोप किती खोडसाळपणाचे आहेत ह्याची पूर्ण कल्पना येते. हा सर्व पत्रव्यवहार द. ब. पारसनीसांचे ज्येष्ठ चिरंजीव अमृतराव ह्यांनी अद्यापि आहे तसा ठेवला आहे. ह्या सर्व सरळ व्यवहारामुळेच पारसनीसांच्या मृत्यूनंतर त्यांच्या मुलास तहाहयात रु. २४०० ची वार्षिक पेन्शन मुंबई सरकारने दिली.

मराठीप्रमाणे पारसनीसांचे इंग्रजीवरही प्रभुत्व होते. इंग्रजी भाषेतून त्यांनी ' Notes on Satara, ' ' Mahabaleshwar, ' ' Sangli state, ' ' Panhala ' व ' Poona in By Gone Days ही पुस्तके लिहिली. ह्या व्यतिरिक्त चार्लस किंकेड ह्यांच्या ' History of the Maratha ( 3 Vols ) ह्या पुस्तकाकरिता त्यांनी बहुमोल साहाय्य केले व अनेक मौलिक कागदपत्रे पुरविली, त्यामुळे किंकेडनी पारसनीसांचे नाव वरील पुस्तकावर सहलेखक म्हणून घातले. ही सर्व इंग्रजी पुस्तके कोणातरी इंग्रजी गव्हर्नरच्या किंवा संस्थानिकांच्या विनंतिवरून पारसनीसांनी लिहिली असल्यामुळे ती संबंधित गव्हर्नरास वा संस्थानिकास अर्पण केलेली आहेत.

पारसनीस शरीराने स्थूल, मध्यम उंचीचे, गोरे व देखणे होते, पुणेरी जोडा, पगडी, उपरणे व लांब कोट, धोतर अथवा विजार हा त्यांचा नेहमीचा पोशाख असे. ते मितभाषी होते, परंतु आपल्या मित्रमंडळीत मनमोकळ्या गप्पा मारीत. परिचितांत बापूसाहेब ह्या नावाने ते प्रसिद्ध होते. त्यांना काहीही व्यसन नव्हते. त्यांनी आयुष्यात खूप पैसा मिळविला. परंतु राहते दोन बंगले व म्युझियमची वास्तू यापलीकडे अधिक स्थावर मिळकत त्यांना करता आली नाही. वयाच्या छप्पन्नाव्या वर्षी थोडयाशा आजारानंतर त्यांना ३१ मार्च १९२६ रोजी मृत्यु आला, त्यामुळे त्यांच्या अनेक आशा–आकांक्षा अपुऱ्या राहिल्या.










श्री. ना. वा. मराठे

# नवभारताची जडण-घडण

**लोकसभेची मध्यावधि निवडणूक यशस्वीरीत्या पार पडली, आणि त्या अमृतमंथनातून जे अनपेक्षित नवनीत बाहेर आले ते भारतीयांना आणि भारतीयेतरांनाही अनपेक्षित होते. या अमृतमंथनाचा फार दूरवर खोल परिणाम होणारा असल्याने त्यांचे ऐतिहासिकदृष्टया समालोचन करणे अवश्य झाले आहे.**

काँग्रेसच्या अन्तर्गत मतभेदांमुळे भारतीय काँग्रेसची चिरफाड झाली आणि अन्तर्गत मतभेद चव्हाटयावर आले. या मतभेदांची नांदी लालबहादूरशास्त्रींच्या निधनोत्तर श्रीमती इंदिरा गांधींची नेतेपदी निवड झाली त्यावेळेपासूनच निदर्शनास आली होती. श्री. मुरारजी गट आणि इंदिरा गट किंवा नंतर रुळलेल्या सिंडिकेट आणि इंडिकेट परिभाषा त्या मतभेदांच्या निदर्शकच होत्या. पार्लमेंटमधील बहुसंख्यांकांनी इंदिराबाईच्या गटाचा पाठपुरावा केल्याने पार्लमेंटमध्ये गेले वर्ष दीड वर्ष मोठे संघर्षात्मकच गेले. सिंडिकेट ग्रूपचे लोकसभेचे ६० सभासद विरोधी गटात जाऊन बसल्याने बँकांचे राष्ट्रीयीकरण, प्रिव्ही पर्सेस् सारख्या सरकारी बिलांनी मार खाल्ला. याच प्रमाणात सरकार चालवावयाचे असते तर कम्युनिस्ट पार्टी ऑफ्-इंडिया, मुस्लीम लीग, डी. एम्. के. सारख्या मतलबी राजकीय पक्षांच्या पाठिंब्यावर इंदिराजींना आणखी एक वर्ष सरकार चालवणे फारसे कठीण नव्हते. परंतु मुंबई येथील अ. भा. अधिवेशनात 'गरीबी हटाव'चा ऐतिहासिक ठराव पास केल्यावर तदनुरूप कार्य करण्याची नैतिक जबाबदारी सत्ताधारी काँग्रेसवर येऊन पडली होती. 'गरीबी हटाव'चा कार्यक्रम अंमलात आणावयाचा तर तदनुरूप कार्यक्रमाची योजना लोकसभेत पास करून घेणे अगत्याचे होते. असलेल्या तुटपुंज्या सभासदांच्या मतांवर तो हमखास पास करून घेता येईल याची शाश्वती नव्हती. पण त्या ठरावावर लढवलेल्या उ. प्र. मधील निवडणुकांच्या वरून अंदाज घेता असे आढळून आले होते की तो जनतेच्या जिव्हाळ्याचा प्रश्न होता. आपली शक्ति एकवटून त्याच महत्त्वाच्या प्रश्नावर मध्यावधि निवडणुका घेऊन जनतेचा कौल घेऊनच मग पुढच्या कार्याला लागावे या विचाराने सत्ताधारी काँग्रेसने आपले धोरण आखले. काँग्रेसच्या वरिष्ठ वर्तुळात या निवडणुकांतून हमखास बहुमत मिळेल अशी अपेक्षा होती, पण राजकारणी तज्ञांना त्याबद्दल खात्री नव्हती. तो एक क्रिकेटचा खेळ होता. उत्तम खेळाडू, प्रशस्त अंगण सारे काही असूनही हमखास खेळ जिंकता येईलच असा भरवसा कोणताच खेळाडू देऊ शकत नाही. हीच स्थिति या निवडणुकांची होती. यात भय होते, धोका होता, संशयी वातावरण वावरत होते. जुनी काँग्रेस, जनसंघ, स्वतंत्र, सं. सो. पा., काही अंशी भा. क्रां. दल यासारख्या पक्षांनी वडी आघाडी उघडली होती. सारे पक्ष लोकशाही, समाजवाद, यासारख्या सर्वमान्य शब्दांची पखरण वापरीत होते. निवडणुकांचे निर्णय जाहीर होईपर्यंत भारतातील राजकीय वातावरण विशेष तंग होते. कारण यातूनच 'इंदिरा हटाव' की 'गरिबी हटाव' चा निर्णय लागणार होता. भारत प्रगतिशील धोरणामागे जाणार की परंपरावादी भांडवलदार वर्गामागे राहाणार होता हे ठरावयाचे होते. भारतीय जनता ही लोकशाहीची प्रक्रिया आपल्या जनमनांत रुजवून त्याचे फल हाती घेणार की फसव्या घोषणांनी फसून आपल्या महत्त्वाच्या मतांचा दुरुपयोग करणार याचे प्रात्यक्षिक होणार होते. साऱ्या सुबुद्ध भारतीयांचे आणि जगाचे लक्ष या मतपेटयांच्या निर्णयावर केन्द्रित झाले होते. १९५२, १९५७, १९६२, १९६७ या चार सार्वत्रिक निवडणुकांतून जनतेला राजकीय शिक्षण मिळालेले होते. आपले भवितव्य आपणालाच ठरवावयाचे असते याची समज-उमज भारतीय जनतेला पूर्णपणे आली होती. याचे प्रात्यक्षिक १९७१ च्या मध्यावधि निवडणुकीने दाखवून दिले आणि लोकसभेत सत्ताधीश काँग्रेसला नुसते बहुमतच नव्हे तर पूर्वीच्या कोणत्याही निवडणुकीतून मिळालेले नव्हते एवढे प्रतिनिधी संख्या बल (= दोन तृतीयांशापेक्षाही अधिक) 'गरीबी हटाव'








पक्षाला मिळाले. या निवडणुकीचे परिणाम येत्या पाच वर्षात दिसून येतील आणि अतएव या निवडणुकीच्या निकालाचे महत्त्व अनन्यसाधारण आहे.

### स्वातंत्र्योत्तर पहिले दशक

स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या कालखंडातील पहिले दशक हे नवभारताच्या आशा-आकांक्षांच्या जडण—घडणीचा पाया घालण्यात खर्ची पडले. १९५०-५९ चा हा कालखंड त्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा समजला गेला पाहिजे. भारताची लोकशाहीप्रधान राज्यघटना मंजूर करून घेण्यापासून तो अनेक कार्यांच्या प्रारंभाचा काल होता. भारताने पंचवार्षिक योजनांना याच काळात सुरुवात केली. काँग्रेसच्या धोरणानुसार भाषानिहाय प्रांत रचना करण्याचा निर्णय याच वेळी घेण्यात आला. तत्पूर्वी सारी संस्थाने विलीन करून सारा भारत-भूप्रदेश एका अंमलाखाली आणण्याचा ऐतिहासिक विक्रम याच दशकात अंमलात आला. मिलिटरी अकादमी, साहित्य अकादमी, संगीत नाटक अकादमी, ललितकला अकादमी सारख्या संस्थांमार्फत कलांना उत्तेजन देण्याचे कार्य याच काळी, सुरू झाले. C. S. I. R., C. A. R., C. M. R., सारखी कौन्सिल्स् स्थापून अनेक प्रकारच्या प्रयोगशाळा आसेतुहिमाचल सुरू केल्या. भाभा अॅटमिक रिसर्च संस्थेमार्फत अणू संशोधन सुरू झाले. हिंदुस्थान स्टील, इलेक्ट्रॉनिक्स्, विमान कारखाने, खत कारखाने, कागद कारखाने, अवजड इलेक्ट्रिक मशिनरींचे कारखाने, रेल्वे एंजिन्सचे कारखाने, औषधांचे कारखाने, जहाजांचे कारखाने यासारख्या सार्वजनिक उद्योगधंद्यांचे पायाभरणी समारंभ याच कालखंडात झाले. राष्ट्रीयकरणाचे प्रयोगही याच कालखंडात आखण्यात आले. आयुर्विम्याचे राष्ट्रीयीकरण, इंपीरियल बँकेचे राष्ट्रीय बँकेत रूपांतर, रिझर्व बँकेचे राष्ट्रीयीकरण इत्यादि प्रयोग यशस्वी करण्यात आले. याच काळी राधाकृष्ण कमिशन, संस्कृतकमिशन, युनिव्हर्सिटी ग्रँट्स् कमिशन, पे कमिशन, प्लॅनिंग कमिशन, सारखी कित्येक कमिशने विचारविनिमय करण्यासाठी नेमण्यात आली. काहींच्या शिफारसी अंमलात आणता आल्या तर काहींच्या शिफारसी तशाच कागदोपत्री पडून राहिल्या. काही झाले तरी भारतीय स्वातंत्र्योत्तर कालीन या पहिल्या दशकाचा कालखंड काही प्रमाणात विधायक कार्याचा म्हणून समजला जाण्यास हरकत नाही.

### स्वातंत्र्योत्तर दुसरे दशक

पण ही स्थिति त्याच प्रमाणात ६० ते ६९ या दशकाच्या कालखंडात राहिली नाही. त्याची सुरुवात अकस्मात् पेटलेल्या भारत चीन वेबनावाने झाली. मंत्रिमंडळात महत्त्वाचे फेरफार करावे लागले. म्हणता म्हणता अन्नधान्यसमस्या विकट झाली. दुष्काळामुळे कंट्रोल बसविणे क्रमप्राप्त झाले. ओघानेच भाव भरमसाट वाढू लागले. त्यातूनच १९६५ चे भारत—पाक युद्ध जुंपले. भाववाढीला या युद्धाने मदतच मिळाली. पगारवाढ, संप यांना ऊत आला. पंडित नेहरूंचे १९६४ मधील निधन, लालबहादूर शास्त्रींचे आकस्मिक निधन, या सारख्या घटनांनी केंद्राची पकड ढिली झाली. काँग्रेसला पुरोगामी नेता शोधता शोधता नाकी नऊ आले. अन्तर्गत विरोधाने सर्वसंमत समन्वय घडवून आणू शकणारी व्यक्ति म्हणून श्रीमती गांधींची प्रधानपदी निवड करण्यात आली होती. या विरोधांचा फायदा घेऊन भारतात राज्या-राज्यांतून काँग्रेसची शक्ति खच्ची होऊ लागली होती. केरळ, पश्चिम बंगाल तर पूर्णपणे कम्युनिस्टांच्या छत्राखाली गेला होता. पंजाब, बिहार, मध्यप्रदेश, उत्तर प्रदेश, पश्चिम बंगाल मध्ये पक्षोपपक्षांच्या लाथाळींमुळे स्थिर सरकार निर्माण करणे फारच मुष्किल होत होते. हीच स्थिति केंद्रस्थानी येण्याची पूर्वचिन्हे प्रभावीपणे दिसून येऊ लागली होती. डॉ. झाकिर हुसेनच्या आकस्मिक निधनाने रिकाम्या झालेल्या राष्ट्रपतिपदाच्या निवडणुकीने या समजुतीला पाठिंबाच मिळाला. आणि याच मुद्यावर काँग्रेसची शकले होण्यास सुरुवात झाली. जणू हा कालखण्डच मुळी राजकीय अस्थिरतेचा होता. कम्युनिस्ट पार्टीची शकले झाली, सोशॅलिस्ट पार्टीचे तेच झाले. बंगालमध्ये बंगला काँग्रेस, केरळ मध्ये केरळ काँग्रेस, उत्कल काँग्रेस, जन काँग्रेस, भारतीय क्रांतिदल, अवामी लीग, आझाद हिंद, फॉर्वर्ड ब्लॉक, मुस्लीम लीग, द्रविड मुन्नेत्र कळघम, निजलिंगप्पा काँग्रेस, जगजीवनराम काँग्रेस, नक्षलवादी, यासारख्या कित्येक राजकीय पक्षोपपक्षांची








जाळी निर्माण झाली. भारताचे राजकीय भवितव्य काय होणार आहे? केंद्र–राज्यांमधील संबंध काय असावेत यावर उलट सुलट विचार सुरू झाले. या पार्श्वभूमीवर इंदिरा गांधींनी घेतलेल्या मध्यावधि निवडणुकीचा विचार केला तर असे लक्षात येते की 'गरिबी हटाव' चा मंत्रप्रयोग करून इंदिराबाईंनी इन्द्रजाल निर्माण केले; आणि या पक्षोपपक्षांना बाजूला सारून या जुगारांतील सारा पट संपूर्ण जिंकून घेतला आहे. या लोकसभेत मिळालेल्या अभूतपूर्व यशाने हुरळून गेलेल्या दिसत नाहीत. पार्लमेंटच्या पक्षप्रमुखाच्या निवडणुकीच्या वेळी केलेल्या भाषणात त्यांनी सांगितले की "जनतेने दिलेल्या या कौलाने आपल्या विधायक कार्याचे दरवाजे उघडले आहेत. आपण ज्या दहा कलमी कार्यक्रमाच्या घोषणेने जनतेचे लक्ष आपल्याकडे वेधून घेतले आहे त्याला आपण जागले पाहिजे. 'गरिबी आणि बेकारी' या दोन शत्रूंबरोबर आपल्याला सामना करावयाचा आहे. माझ्या सरकारला त्या दृष्टीने विधायक कार्यक्रमाला हात घातला पाहिजे."

## आणि आता तिसरे दशक

अशा तऱ्हेने ६० ते ६९ या दशकांत उतरती कळा लागलेल्या भारतीय राजकारणाला ७० ते ७९ या दशकांत वेगळेच वळण मिळण्याची सुचिन्हे दिसू लागली आहेत. खऱ्या अर्थाने भारतीय राष्ट्रीय काँग्रेस पुनश्च जनमनात शिरली आहे. 'गरिबी हटाव' या मंत्राने काँग्रेसने भारतीय जनतेच्या जनमनात एका नवीनच आशा-अंकुराला उगविण्यास प्रोत्साहन दिले आहे. केवळ 'गरिबी आणि बेकारी' हे दोनच प्रश्न सोडवायचे असते तर प्रश्न वेगळा होता. भारतापुढे अनंत प्रश्न आ वासून उभे आहेत. राजकारणतज्ज्ञांनीं या प्रश्नांची साधक बाधक चर्चा सुरू केलीच आहे : (१) राजकारणाला स्थैर्य आणण्याच्या दृष्टीने भारतीय राज्यघटनेत फेरफार करावयाचे आहेत. आजच्या सोईनुसार दोनतृतीयांश बहुमतावर घटनेत सहज फेरफार होऊ शकतील ! पण त्यांत धोकेहि आहेत. अशाच धोक्यांतून जर्मनीत हिटलर निर्माण झाला होता. त्या हिटलरला सावरता सावरता जगाच्या राजकारणात पेंचप्रसंग निर्माण झाले होते हा धोक्याचा लाल बावटा आपल्यापुढे ताजा तवाना आहे. (२) मूलभूत हक्कांवर गदा तर येणार नाही ना? याचाहि विचार या संबंधांत जरूर करावा लागेल. (३) गोलक विहारी केसमुळे निर्माण झालेल्या प्रश्नांचा विचारही या सन्दर्भात लक्षांत घेण्यासारखा आहे. (४) मिळकत (income) आणि संपत्ति (property) यांच्यावर निर्बंध घालण्याचा विचार प्रामुख्याने अर्थशास्त्रज्ञांनी सुचवलेला आहे. साम्यवादी लोक-सत्तेत हा विचार सर्वसंमत ठरतो. भारतीय कृषिप्रधान देशांत मिळकत व संपत्ति यावर कुठपर्यंत मर्यादा घालणे सोपपत्तिक ठरणार आहे याचाही साकल्याने विचार व्हावयास हवा. (५) सुप्रीम कोर्टाच्या कार्यप्रणालीत आमूलाग्र बदल करावा लागेल– असे प्रिव्ही पर्सेसच्या केसमध्ये मार खाल्यावर काँग्रेसचे धुरीण म्हणू लागले होते. त्यांना त्या वेळी 'Committed justice' हवी होती. या उलट न्या. मू. हिदायतुल्ला, शिक्री, हेडगे सारख्या न्यायमूर्तींनी त्या कल्पनेला विरोध केला होता. न्यायासने ही नेहमी स्वतंत्रच राहिली पाहिजेत, त्यांत राजकारणाला स्थान मिळू नये हे म्हणणे युक्तिसंमत दिसते. न्यायदेवता हीच अखेर राज्यघटनेची बूज राखणारी सर्वश्रेष्ठ संस्था असल्याने तिच्या कार्यात ढवळाढवळ करण्याचा अधिकार राजकीय पुढाऱ्यांना असूच नये. सर्वाधिकारी लोकसभेने दोन तृतीयांश मताधिक्याने मूळ घटनेत फेरफार केले आणि तेच फेरफार पुनः एकदा कालाच्या प्रवाहात निरुपयोगी ठरणारच नाहीत असे नाही; त्यातही धोका आहेच. (६) संप, टाळेबंद, बेशिस्त, खून, मारामाऱ्या यासारख्या प्रश्नांनी मजुराचे जीवन बरबटलेले आहे ते सुधारून राष्ट्रीय उत्पादनाची वाढ करण्याचा कार्यक्रम हाती घेणे हा एक असाच अत्यंत महत्त्वाचा पण बिकट प्रश्न आहे. (७) विद्यार्थीवर्गातील बेछूटपणा, बेरोजगारी, विद्येवरील आणि गुरुजनांवरील अश्रद्धेमुळे भारतीय युनिव्हर्सिटीतून निर्माण झालेले अस्थिर वातावरण कसे सुधारणार? (८) आणखी एक धोका संभाव्य आहे. १९७१ मधील निवडणुका जिंकण्यासाठी श्रीमती इंदिरा गांधींना देवता बनविण्यात आल्या. व्यक्तिपूजा भारतात नवीन नाही.










भारतातील पंथ व संप्रदायांचा इतिहांस त्याची पुरेपूर साक्ष आहे. पं. जवाहरलाल नेहरूनंतर पुढे कोण ? या प्रश्नाभोवती भारतीय राजकारण अनेक दिवस घोंगावत होते. आजच्या निवडणूक-शर्यतीतून सहीसलामत अजिंक्य राहिल्याने पुनश्च तोच प्रश्न उभा राहाणार आहे. पण त्याची भीति आताच बाळगण्याचे कारण नाही. ६० ते ६९ ची उतरती कळा जाऊन नवचैतन्याची जी सर्वसंमत लाट ७०–७९ या दशकात येऊ घातली आहे तिचे स्वागत करावयासच हवे.

कारण याच कालखंडात जगातील सर्वात मोठ्या लोकशाही राष्ट्रातील लोकशाही कोणत्या काल-चक्राच्या फेऱ्यातून जाते याचा सुगावा लागेल. भारतीय जनतेने या घटकेला दाखविलेला सुजाण जागृतपणा असाच पुढे टिकवील असे म्हणण्यापुरता आशावाद निदान आजच्यापुरतातरी व्यक्त करता येण्यासारखा आहे. त्यासाठी इंदिराजींनी म्हटल्या-प्रमाणे काँग्रेसच्या पुढाऱ्यांनी सदैव कृतसंकल्प राहिले पाहिजे एवढेच नव्हे तर शासनांत घुसलेल्या अनंत दुष्प्रवृत्तींचा मागोसा घेऊन त्यांचा मागोवा घेत राहिले पाहिजे. शिथिल-बेशिस्त शासन उत्तमोत्तम कल्पनांचा चुराडा करण्यास कारणीभूत ठरते. शासनसुधारणा कमिटीने ( Administrative reforms Commission ) शासनव्यवस्थेत कित्येक सुधारणा जशा सुचविलेल्या आहेत तशाच सुधारणा आतापर्यंत केन्द्रसरकारने व राज्यसरकारने नेमलेल्या सुमारे तीनशे साडेतीनशे कमिशन्स्, बोर्डस्, कमिटीज्, यांनी सुपूर्त केलेल्या रिपोर्टस् मधून धूळ खात पडलेल्या आहेत. या सर्व सुधारणा काय आहेत हे समजून घेण्यासाठीच त्यांचा संग्रह करणारे आणखी एक संग्राहक मंडळ नेमावे लागेल. त्या सुधारणातून ग्राह्याग्राह्य सुधारणा ठरविण्यासाठी सरकारी रीतिरिवाजाप्रमाणे आणखी एक सबकमिटी नेमावी लागेल !

या निवडणुकीतून प्रत्ययाला आलेली आणखी एक ठळक गोष्ट अशी आहे की बराचसा सुशिक्षित वर्ग या वेळी तटस्थ राहिला. तर मागासलेल्या वर्गाने अहमहमिकेने त्यात भाग घेतला. विशेषत: असे म्हणतात की लोकसभेत निवडून आलेल्या उमेदवारांतही मध्यमवर्गाचे वा भांडवलदार वर्गाचे हितसंबंध रक्षण करणारे प्रतिनिधि बऱ्याच कमी प्रमाणात आहेत. अनेक प्रतिनिधींची निवड ही त्या त्या मतदारसंघांतील बहुसंख्य जाति–जमातींकडे लक्ष ठेवून करण्यात आली होती– धर्म, वंश, जात, लिंग, पंथ निरपेक्ष समाजव्यवस्था करू इच्छिणाऱ्या राजकीय पक्षाने आपले प्रतिनिधि त्याच तत्त्वाने निवडावे हा विरोध कसा समन्वित करावयाचा हा एक राजकारणातील कूटप्रश्न आहे. राजकारणात असे अनंत कूटप्रश्न असतात. ऋषींचे कुल आणि नदीचे मूळ शोधणाऱ्यांचे प्रयत्न असफलच राहतात. सुशिक्षितांना 'गरीबी हटाव, बेकारीचे निर्मूलन' या महामंत्रात काही रस वाटला नसावा. किंवा तो धकाधकीचा मामला कैसा जमे अशक्ताला ? असे समजून त्यात या वर्गाने प्रामुख्याने भाग घेतला नसावा. किंवा आपल्या मतांवरच त्यांचा विश्वास नसावा. कालाच्या ओघात स्वतंत्र मत व्यक्तविण्या-एवढे स्वातंत्र्य मतदानपेटीतून उपलब्ध होत नाही, असेही त्याला वाटत असावे. निवडणूक झाल्या झाल्या घेण्यात आलेल्या काँग्रेसच्या वर्किंग कमिटीने **दारिद्र्य, बेकारी, विषमता** या संबंधीच्या दहा कलमी योजनांची पुनः घोषणा केली आहे. त्यामुळेहि जनतेचे लक्ष याकडे पुनश्च वेधले गेले आहे एवढेच नव्हे तर विदेशी पत्रांनी यासंबंधी व्यक्त केलेली मते विचारात घेण्यासारखी आहेत. लंडन टाइम्स म्हणतो –' भारतांतील लोकसभेच्या मध्यावधि निवडणुकीच्या निकालाने श्रीमती गांधी यांची प्रतिमा तर उजळून निघालीच परंतु त्या राष्ट्रीय नेत्या असल्याचे सिद्ध झाले आहे' या नंतर टाइम्स म्हणतो – "भारतांतील परंपराप्रिय समाजाचे परिवर्तन करण्याचे काम कठीण आहे परंतु देशापुढील प्रश्नांचा नव्याने विचार करण्याची त्यांना संधि प्राप्त झाली आहे."

भारतीय जनतेप्रमाणे इतर देशातील जनताहि या निवडणुकीच्या निकालाने भारावून गेली आहे याचे एक ताजे उदाहरण म्हणजे ग्रेटब्रिटनच्या मुख्यप्रधानांनी श्रीमती इंदिरा गांधींना कॉमन वेल्थच्या सभेला पाचारण केले असून त्यांच्या भेटीत त्यांना ऑक्सफर्ड विद्यापीठामार्फत डी. लिट्. ची सर्वोच्च सन्माननीय पदवी बहाल केली असून ती कृपया मान्य करण्याबाबत विनंती केली

असल्याचे प्रसिद्ध झाले आहे. युगोस्लावियाचे मार्शल टिटो म्हणतात –

This is decisive turning point in the post independence history of the country ... proof of wide and resolute support of Indian people to the programme of socio-economic reforms which were inspired by Mrs. Indira Gandhi. The victory of Congress also constituted to the best guarantee of further prosperity of India and the strengthening of its important role as a constituetly non-aligned country in the struggle for peace and equal international relations ...

### कोण घडवतो ?

या साऱ्या घटनांचा तात्त्विक दृष्टया विचार करता भारतीय तत्त्वचिंतकानी केलेली विधाने पुनः-प्रत्ययान्वित होत आहेत असे दिसते. 'माणूस इतिहास घडवतो' की भोवतालची परिस्थिति एखाद्या सामान्य माणसाला निमित्तभूत बनवून इतिहास घडवते ? अथवा इतिहास आपला माणूस शोधून काढतो ? या विवाद्य प्रश्नाची चर्चा महा-भारतकारापासून आतापर्यंतच्या अनेक राज्यशास्त्र-ज्ञांनी केलेली आहे.

"कालो वा कारणं राज्ञः राजा वा कालकारणम् ?
इति ते संशयो मा भूत् राजा कालस्य कारणम्"

– राजा म्हणजेच पर्यायाने ज्याचे हातात सत्ता असते ती व्यक्ति कालाच्या प्रवाहाला दिशान्वित करते. कालाचा ओघ ओळखून त्याला प्रत्यक्ष स्वरूप देण्याचे काम अध्वर्यु करतो. शक्ति मागे उभीच असते. तिला कार्यान्वित करण्याचे श्रेय 'निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्' असे सांगून भगवंतांनी अर्जुनाला दिले. स्वातंत्र्योत्तर कालखंडात पंडित नेहरूंनी धुरीण बनून भारतीय लोकशाहीला कार्यप्रवण करण्याचे महत्त्वाचे ऐतिहासिक कार्य पार पाडले. सामाजिक नियंत्रणाला काही बाबतीत पाया घालून दिला. मधील कालखंडांत त्याला खो बसलेला दिसत होता. मार्क्सच्या विरोधविकासवादी तर्कशास्त्रात बोलायचे तर पहिल्या ५०–५९ या दशकात पंडित नेहरूंनी काही सिद्धांत प्रत्यक्षात आणण्याचा प्रयत्न केला. त्याला दुसऱ्या ६०–६९ दशकात विरोध होऊ लागला. या थिसिस्–ॲंटि-थिसिस् मधून सिंथिसिस् बनविण्याचे कार्य श्रीमती इंदिरा गांधींनी हाती घेतले आहे ते ७०–७९ या दशकात त्यांना पुरे करावयाचे आहे. समाजाच्या स्वीकृत कार्यात श्रीमती इंदिरा गांधी निमित्त मात्र बनत आहेत असे म्हटले तर तत्त्वचिंतकांचे चुकले कुठे ?

आधुनिक नव भारताची जडण घडण करण्याचे कामी एकाच माणसाचे प्रयत्न उपयोगी पडले असे कोणताही सुबुद्ध माणूस आजच्या काळी समजत नाही. प्रथम लोकमत तयार होत असते आणि त्यातून व्यक्ति उदयाला येते. व्यक्तिपूजेचा आजचा काळ नाही. सामूहिक जबाबदारीवरच पण काही सुजाण व्यक्तींच्या नेकीने कार्य पुढे रेटणाच्या स्वभावामुळे कार्याच्या गति–विधींना कलाटणी मिळते. राममोहन राय, महर्षि कर्वे, आगरकर यांच्या काळी आजच्या एवढी दळणवळणाची साधने उपलब्ध नव्हती. त्यांचे हाती सामाजिक वा राजकीय सत्ताही नव्हती तथापि त्या काळाचे मानाने त्यांनी केलेले लोकजागृतीचे व समाजाला प्रगति-पथावर नेण्याचे कार्य कितीतरी लोकोत्तर होते. आजच्याही काळी पं. नेहरू निधनानंतर अखिल भारताला आवाक्यात घेऊन नेकीने, दमाने व निष्ठेने कार्य रेटीत नेणारा अखिल भारतीय नेता दृष्टिपथात नव्हता. गेली दहा पंधरा वर्षे 'पं. नेहरू पुढे कोण ?' या प्रश्नाभोवतीच भारतातील राजकीय तत्त्वचिंतक व परदेशातील तज्ञ रिंगाणा घालताना दिसत होते. १९७१ च्या या नव्या निवडणुकांनी या प्रश्नाचा कायमचा सोक्ष-मोक्ष लागला असून श्रीमती इंदिरा गांधींना एकमेव नेतेपदी नेऊन बसविण्यास मागासलेला, मुस्लीम, स्त्रीवर्ग आणि तरुणपिढी यांनीच प्रामुख्याने मते देऊन मदत केली आहे. कोणत्या ना कोणत्या कारणास्तव घडून आलेल्या या उचित निर्णयाचे भारत स्वागतच करीत आहे यात शंका नाही.











श्री. भास्कर लक्ष्मण भोळे

# संघराज्य-सिद्धांत : एक वस्तुदर्शी चिकित्सा

या शतकाच्या पूर्वार्धात लास्कीने संघराज्याच्या भवितव्यासंबंधी साशंकता व्यक्त केली होती तेव्हा रॉक फेलर आदींनी कालसुसंगत राहाण्याच्या संघराज्याच्या क्षमतेविषयी व तदुद्भूत चिरंतनत्वाविषयी ग्वाही दिली होती. तरी पण कालसुसंगत होण्याच्या या प्रयत्नात संघराज्याचा पारंपरिक सिद्धांतच पार नष्टप्राय झाला हे सत्य आज नजरेआड करून चालणार नाहीं. पारंपरिक सिद्धांतात अंगभूत असलेले दोष टाळण्यासाठी वा संघराज्याचे स्थलकालसापेक्ष स्वरूप घडविण्यासाठी सर्वत्र संघराज्यात पारंपरिक सिद्धांताशी तडजोड करण्यात आलेली आहे.

काहीशा बदललेल्या स्वरूपात पण आजहि जुनी संघराज्य कल्पना प्रत्यक्षात अस्तित्वात आहेच हे दाखविण्याच्या अट्टाहासातून quasi-federalism, Co-operative federalism अशा काही नवीन संज्ञा राजकीय तत्वज्ञांनी वापरल्या असल्या तरी वस्तुनिष्ठ ( impirical ) अभ्यासपद्धतीने संघराज्य कल्पना तपासून पाहाता हे सहज लक्षात येऊ शकते की संघराज्य सिद्धांत आज केवळ एक संविधानात्मक भ्रम म्हणून शिल्लक राहिला आहे. राजकीय वास्तवाशी त्याचा संदर्भच उरलेला नाही. युद्धोत्तर काळात अत्यंत लोकप्रिय ठरलेल्या व मोठ्या प्रमाणावर स्वीकारल्या गेलेल्या या शासनयंत्रणेत स्वीकृतीपासूनच अनेक बदल होत गेले आहेत. ज्या अमेरिकन राज्यघटनेवरून हा सिद्धांत घेतला जातो तिथेहि बदलत्या परिस्थितीमुळे त्यात तत्वापासून होत चाललेली तफावत ॲडॉल्फ ए. बर्ल (फेडरॅलिझम् : मॅच्युअर ॲंड इमर्जंट ) यांच्यासारख्यांच्या लिखाणातून किंवा तिथल्या आंतरशासकीय संबंधांवरील समितीच्या अहवालावरूनहि स्पष्ट होते. सदर सिद्धांत आज राज्यशास्त्राच्या पुस्तकाबाहेर शोधूनहि सापडत नाही.

जगातल्या कोणत्याही एका वा अनेक संघराज्यांचा वस्तुनिष्ठ अभ्यास करून प्रस्तुत लेखातील निष्कर्षांना पुष्टी देता येईल पण तूर्त हा प्रयत्न तेवढा महत्वाकांक्षी नाही. फक्त संघराज्याच्या सिद्धांतार्गतच त्याच्या आत्मनाशाची बीजे कशी होती हे मोजक्या संदर्भांसह दाखविणे एवढाच मर्यादित हेतु या लेखामागे आहे. त्या दृष्टीने 'पारंपरिक सिद्धांत' म्हणून ज्याचा उल्लेख केला जातो त्याचे थोडक्यात विवेचन लेखात येणाऱ्या संदर्भांसाठी आवश्यक वाटते.

संघराज्य म्हणजे राज्याधिकारांची प्रादेशिक निकषांवरून दोन वा अधिक समान व स्वायत्त घटकांत झालेली वाटणी होय. ही वाटणी निश्चित व काटेकोर असायला हवी. लिखित व परिदृढ घटनेत केंद्राच्या व घटकराज्यांच्या अधिकारांची स्पष्ट निःसंदिग्ध नोंद असावी. घटनादुरुस्ती करून घटकराज्यांवर अतिक्रम करण्याची केंद्राला संधि मिळू नये यासाठी घटनादुरुस्तीत घटकराज्यांच्या मताला मान असावा. केंद्रीय संसदेत घटकराज्यांचे हितसंबंध जपण्यासाठी द्वितीयगृह असावे. ते घटकराज्यांचे हितसंबंध जपण्यासाठी द्वितीयगृह असावे. ते घटकराज्यांचे प्रातिनिधिक असावे. सर्व घटकराज्यांना त्यात समान प्रतिनिधित्व असावे. घटकराज्यांच्या समान प्रतिष्ठेचा तो पुरावा आहे. राज्याधिकारांच्या स्वामित्वाविषयी वा घटनेच्या कलमाच्या निश्चित अर्थासंबंधी दुमत झाल्यास न्यायालयीन निर्णय अंतिम असावेत. कारण न्यायालये घटनेचे व विशेषतः अधिकारांचे रखवालदार असतात.

राष्ट्रव्यापी महत्वाचे अधिकार केंद्राकडे व प्रादेशिक महत्वाचे अधिकार घटकराज्यांकडे असे सर्वसाधारण तत्त्व वाटणी करताना पाळले जावे. केंद्र व घटकराज्यांपैकी कुणीच कुणाला दुय्यम ठरू

नयेत; कारण उभयतांचे अधिकार घटनादत्त असल्याने त्यांची प्रतिष्ठा व मान्यता ( sancti-ty) सारखी आहे. अधिकारांसाठी ते परस्परावलंबी नसतात. घटनादत्त कक्षेत केंद्र व राज्ये परस्पर नियंत्रणापासून पूर्णपणे मुक्त व आपापल्या अधिकार बाबींबद्दल निर्णय घ्यायला संपूर्ण स्वतंत्र असावेत. अशा दोन मर्यादित शासनयंत्रणांची निर्मिती संघराज्य कल्पनेत अभिप्रेत आहे. संघटन व स्वतंत्र अस्मिता या बरकरणी परस्परविरुद्ध जुळत्या प्रवृत्तींचा मेळ घालण्याचा प्रयत्न संघराज्यात होतो. ऐतिहासिक, सांस्कृतिक, वांशिक, भाषिक, आर्थिक व भौगोलिक कारणांमुळे अपरिहार्यपणे आलेली विभिन्नता व विविधता व त्यांच्यातून आकारणारी घटकराज्यांची स्वतंत्र अस्मिता अबाधित ठेवून संरक्षणाच्या, विकासाच्या वा अन्य प्रेरणेतून ती घटकराज्ये एकत्र येतात तेव्हा एकत्रीकरणाच्या प्रक्रियेत त्यांना स्वतःचे अस्तित्व पूर्णपणे विलीन करायचे नसते किंवा या विविधतेच्या जोपासनेसाठी आधी एकात्म असलेल्या राज्याचे संघराज्यात रूपांतर करण्यामागची भावनाहि हीच असते.

अठराव्या व एकोणिसाव्या शतकातील नैसर्गिक कायदा व व्यक्तिवादी वैधानिक-राजकीय कल्पनांनी संघराज्याच्या वरील सिद्धांताला जन्म दिला आहे. संघराज्य निर्मितीतून एका नव्या राज्याला अस्तित्व येते. दुहेरी नागरिकत्व स्पष्टपणे दिलेले असो वा नसो, नागरिकत्वाच्या कल्पनेला दुहेरी संदर्भ प्राप्त होतो. आधी स्वतंत्र व सार्वभौम असलेली राज्ये जेव्हा संघराज्याचे घटक होतात तेव्हा एक नवी रचना ( reorientation ) अनेक अर्थांनी होते. केंद्र व राज्ये परस्परांना मर्यादित ठेवून संघराज्याचा समतोल राखतात. त्या दोन पातळ्यांमधील संबंधांच्या करारात्मक भूमिकेवर पारंपरिक सिद्धांताचा खूपच भर आहे.

प्रत्यक्षात हाच संघराज्य सिद्धांतातील सर्वाधिक कच्चा दुवा ठरला आहे. आज अनेक कारणांमुळे उभय पातळ्यांवरील शासनांना आपल्या क्षेत्रापुरतेच मर्यादित राहाणे अशक्य झाले आहे ही वस्तुस्थिति पारंपरिक सिद्धांताच्या मूळे कुठारच ठरली, व परिणामी त्या सिद्धांताची सगळीच गृहीते एकेक करून कोसळून पडली.

प्रथमतःच एक गोष्ट लक्षात येते की संघराज्यातून आढळणारी राज्याधिकारांची वाटणी निश्चित व काटेकोर असूच शकत नाही. काही संघराज्यांच्या घटनांमधूनच सामायिक ( concurrent ) अधिकारांच्या याद्या आढळतात, वाटणी निश्चित नसल्याचाच हा पुरावा आहे. पण ज्या घटनांमधून अशा याद्या नसतात तिथेहि केंद्र व राज्ये यांच्या सामायिक अधिकारांचे 'संधिप्रकाश क्षेत्र' प्रत्यक्षात निर्माण होतेच आहे, उदाहरणार्थ अमेरिकन राज्यघटनेत सामायिक अधिकारांची यादी नाही पण एकविसाव्या घटनादुरुस्तीने अशा सामायिक अधिकारांना जागा दिली त्याचप्रमाणे घटनेचा अन्वयार्थ लावण्याच्या न्यायालयीन अधिकारातूनहि असे सामायिक अधिकार तिथे वाढले आहेत. ऑस्ट्रेलियन राज्यघटनेच्या एक्कावन्नाव्या विभागातील ३९ बाबी सामायिकच होत. स्वित्झर्लंडमधे हे क्षेत्र फार मोठे नसले तरी ते आहेच. रशियाच्या घटनेचे विसावे कलम: 'केंद्रीय कायदा व घटक राज्याचा कायदा यात अंतर्विरोध असल्यास केंद्रीय कायदा श्रेष्ठ' असे असल्याने सामायिक अधिकारांना वाव मिळतोच. कॅनडात शेती, पुनर्वसन, वृद्धत्व वेतन इत्यादी बाबी सामायिक असून त्याबाबत केंद्रश्रेष्ठत्व प्रस्थापित करण्यात आले आहे. म्हणजेच ( सुब्रम्हण्यम् वि. मुत्तुस्वामी खटल्याच्या निर्णयात) भारतीय सर्वोच्च न्यायालयाने म्हटल्याप्रमाणे "विधिविषयक अधिकारांची वाटणी कितीही काळजीपूर्वक व बारकाईने केली गेली तरी उभयतांचे अधिकार अतिव्याप्त वा परस्परातिक्रामी ( overlapping ) होणारच नाहीत हे होणे केवळ अशक्य आहे. एकाच भूभागात समान वैधानिकता असणारे दोन परस्परविरुद्ध कायदे असल्यास विचित्र परिस्थिति निर्माण होईल" स्वाभाविकच अशा प्रसंगी केंद्रास प्राधान्य प्राप्त होते.

केंद्रीकरणाच्या अन्य प्रवृत्तींमुळेहि राज्याधिकारांच्या वाटणीतला समतोल नाहीसा होतो. तिच्या परिदृढतेला व निश्चिततेला तडे जातात.










केंद्रीकरणाची कारणमीमांसा बहुचर्चित असल्याने विस्तार टाळतो, थोडक्यात म्हणजे राष्ट्रव्यापक राजकीय पक्षांची निर्मिती, राष्ट्रभावनेची वाढ, लोककल्याणकारी राज्य-कल्पनेचा प्रसार, केंद्रीभूत राष्ट्रीय नियोजन, दिवसेदिवस वाढत जाणारा राज्यांचा आंतरराष्ट्रीय राजकारणातील सहभाग, वैज्ञानिक शोधांमुळे निकट आलेले विश्व, युद्धे व नैर्सगिक आपत्ती– या व अशा अनेक कारणांमुळे सर्वत्र संघराज्यात केंद्राचे अधिकार वाढत आहेत व अधिकारांची घटनान्यस्त वाटणी तशीच राहिली तरी प्रत्यक्षात बरेच बदल झालेत व होत आहेत. भारतात काँग्रेस पक्षाच्या संघटनेचा परिणाम केंद्र-राज्य संबंधावर आपोआपच असा झाला की केंद्राला प्राधान्य मिळून राज्ये दुय्यम ठरली, जिल्हा वा प्रदेश काँग्रेस कमिट्या या स्वतंत्र धोरण ठरविणाऱ्या संस्था न होता केवळ मध्यवर्ति काँग्रेसने घेतलेले निर्णय प्रत्यक्षात आणण्यासाठी प्रयत्न करणाऱ्या दुय्यम, साहाय्यक (auxiliary) यंत्रणा झाल्या- हे के. संथानम् यांचे मत मान्य करावे लागते. इथे आज प्रादेशिक पक्षांच्या द्वारे स्वायत्ततेचे एक आत्यंतिक टोक गाठले जाते व विघटनात्मक शक्ती तोंड काढतात तर राष्ट्रव्यापी पक्षांद्वारे केंद्राकडून राज्यांवर निर्णय लादले जातात व ती स्वायत्तताच पार नाहीशी होते, अमेरिकेत 'अभिप्रेत अधिकारां'-(Implied Powers) च्या परिणाम स्वरूपी; स्वित्झर्लंडमधे 'राजकीय, आर्थिक व सामाजिक 'क्षेत्रातील केंद्रगामी शक्तींमुळे' ; आधीच भारतातील फुटीर प्रवृत्ती व विघटनात्मक शक्ती लक्षात घेऊन घटना-कारांनी केंद्र प्रबळ असावे अशा तरतुदी केल्या आहेत त्यात प्रारंभी एकपक्षीय राजवटीची भर पडल्यामुळे; आनुषंगिक बाबीं- (Incidental matters) वर कायदे करण्याच्या कॅनडामधील अधिकारामुळे; रशियाच्या एकपक्षीय पद्धतीमुळे – अशा प्रकारे अनेक समान व काही विशिष्ट कारणांमुळे केंद्राच्या अधिकारकक्षेत प्रत्यही भर पडतांना सर्वत्र दिसते.

आकस्मिक आणीबाणीच्या प्रसंगी केंद्रास दिलेले खास अधिकारसुद्धा ह्या वाटणीचे संतुलन पूर्णपणे बिघडवीत असतात. परकीय आक्रमण, अंतर्गत यादवी व गैरव्यवस्था, घटकराज्याची असमर्थता किंवा आर्थिक अस्थैर्य अशा कारणांसाठी आणीबाणी जाहीर करून कमालीचे केंद्रीकरण करण्याची तरतूद भारतीय घटनेत आहे. अशावेळी राज्यांच्या अधि-कार यादीत असलेल्या कोणत्याहि बाबीसंबंधी कायदे करण्याचा अधिकार केंद्रास प्राप्त होतो. राज्यकारभारात आवश्यक असलेली लवचिकता अशा अनेक मार्गांनी येऊ शकते. पारंपरिक सिद्धांतात तिला मुळीच स्थान नाही.

अमेरिकेत केंद्राला जरी आणीबाणीचे अधिकार नसले तरी न्यायालयीन निर्णयांमुळे असे अधिकार आवश्यक तेव्हा केंद्र उपभोगू शकते. तिथल्या सुप्रीम कोर्टाच्या एका निर्णयात म्हटल्याप्रमाणे : 'आणीबाणी जरी अधिकार निर्मित नसली तरी घटनादत्त अधिकारांचा पूर्ण वापर करण्याची संधि ती निश्चितच देत असते.'

पुन्हा भारतात केंद्राची स्वतःची अशी स्वतंत्र प्रशासन यंत्रणा नसल्यामुळे केंद्रीय कायद्यांच्या प्रशासनासाठी केंद्राला राज्यांवरच अवलंबून राहावे लागते. पण त्यातूनच राज्यांना त्या बाबत मार्गदर्शन करण्याचा अधिकारही केंद्राला प्राप्त होतो.

राजस्थानचा अभ्यास करून इक्बाल नारायण व माथूर यांनी काढलेले काही निष्कर्ष इतरही राज्यांना लागू ठरावेत. राज्याच्या धोरणनिर्णयां-बद्दल ते म्हणतात : राज्यसरकार आपली निर्मिती– उद्दिष्टचे (targets), स्वतःच्या तांत्रिक क्षम-तेच्या वा विवेकी नियोजनाधारे निश्चित करण्या-ऐवजी, अखिल भारतीय निर्मिती-उद्दिष्टे समोर ठेवून त्याप्रमाणात ठरवितात वा कमी–अधिक करतात. स्वतःच्या उत्पादन साधनांचा व गरजांचा त्यात विचार होतोच असे नाही. केंद्रीभूत नियोज-नाचा हा परिणाम आहे. केंद्रपुरस्कृत योजना हाती घ्यायला घटकराज्ये उत्सुक असतात कारण त्यासाठी केंद्राकडून आर्थिक मदत मिळते. परिणामी केंद्रशासन घटकराज्यांच्या उद्दिष्टांवर व त्यांच्या अग्रक्रमावरच परिणाम करीत नाही तर आर्थिक आमिषांच्या आधारे ते राज्यशासनाच्या प्रयत्नांना हवी ती दिशाही लावू शकते.








नियोजनाचा परिणाम भारतातील केंद्राच्या अधिकारांपेक्षा घटकराज्यांच्या अधिकारांवर अधिक झाल्याची साक्ष के. संथानमसुद्धा देतात. त्यांच्या मते पहिल्या पंचवार्षिक योजनेच्या एकूण खर्चापैकी ७०% खर्च घटक राज्यांच्या अधिकारकक्षेत येणाऱ्या बाबींवर (उदा. शिक्षण, स्वास्थ्य, जंगले, शेती इत्यादि) झाला. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेतही हा खर्च ६५% च्या आसपास झाला आहे. निर्णय कशाप्रकारे घेतले जातात ही तशी गौण बाब आहे. एक गोष्ट निश्चित की त्यांची राज्यपातळीवर अंमलबजावणी घटकराज्यांच्या कार्यकारी मंडळाने करायची पण ते घेतलेले मात्र केंद्रानेच असणार. घटक राज्यांच्या दृष्टीने विचार करता नियोजनाने संघराज्यात्म घटनेला उल्लंघितच ( supersede ) केलेले असून हे उल्लंघन विधि अथवा संविधानाधारित नसून केवळ मान्यता व संमतीवर आधारलेले आहे. वेंकटरंगैयांसारख्या या विषयाच्या व्यासंगी विचारवंतांना यातून सहकारी संघराज्याची कल्पना साकार होताना दिसते. या सहकार्याची दुसरी जी संघर्षात्मक बाजू असते तिचा पुरेसा सम्यकपणे ते विचार करीत नाहीत. केंद्र व राज्यांच्या संघर्षात्मक संबंधामुळेच भारतीय संघराज्यातील केंद्रीकरण पुस्तकी ठरले आहे. आणीबाणी व आर्थिक नियोजन सोडल्यास केंद्रश्रेष्ठत्व फक्त घटनेच्या शब्दातच शिल्लक राहाते. "घटना घडवितांना झालेल्या चर्चांमधे भारताचे हॅमिल्टन होते तसेच भारताचे जेफर्सनहि होते. अंती हॅमिल्टनचा विजय झाला" हा डॉ. एस्. पी. अय्यरांनी वर्णिलेला विजय फक्त घटनेच्या कलमांतूनच झालाय. कॉंग्रेसची एकपक्षीय राजवट संपुष्टात येते न येते तोच केंद्र व घटकराज्ये यांच्यातील संतुलन घटकराज्यांच्या बाजूने झुकत चाललेले आहे. हिंसक आंदोलनाद्वारे केंद्राला शरण आणण्याचे अनेक प्रयत्न होत आहेत. सामाजिक, आर्थिक वा राजकीय ( सत्य वा कल्पित ) उपेक्षा फुटीर प्रवृत्तींना जोपासत आहे. राज्याराज्यातील तणावांमुळे केंद्राला अनेक बाबींसंबंधी निश्चित निर्णय घेणे अशक्य झालेले आहे. हे अनिर्णित प्रश्न प्रत्यही घटनात्मक मान्यतेलाही आव्हाने निर्माण करीत आहेत. मातृभाषेतून शिक्षण प्रादेशिक अस्मिता जोपासणाऱ्या 'सेनां'चा उदय या सर्वांचा परिणाम असा होणार की राज्या-राज्यातील लोकांचे चलनवलन ( mobility ) थांबेल, मग त्या राज्यसमूहाला अंती एका समावेशक संघराज्याचे स्वरूप उरेल काय ? हाच प्रश्न आहे. तात्पर्य, केवळ संविधानातील अधिकारांमुळे केंद्र सबळ होऊ शकत नाही याचे भारतीय संघराज्य हे उत्तम उदाहरण होय. बंगालात नक्सलवाद्यांनी चालविलेला रक्तपात व विध्वंसन थांबविण्यास असमर्थ ठरत असलेले केंद्रशासन, निवडणुकांच्या राजकीय डावपेचांसाठी केरळातल्या अल्पसंख्याकांच्या दोषांवर पांघरूण घालू पाहाणारे केंद्रशासन, संपन्न व बहुप्रसव घटकराज्यांकडून शिलकी धान्य घेऊन दुष्काळी व अल्प उत्पन्न असणाऱ्या राज्यांना देऊ न शकणारे केंद्र– या केंद्राला अधिक सामर्थ्यशाली म्हणावेच कसे ? घटनादत्त अधिकारांच्या दृष्टीनेच पाहायचे तर यापैकी केंद्रशासनास अशक्य असे काहीच नाही. पण प्रत्यक्षात ते करीत नाही. केंद्राच्या नाकर्तेपणाला कोणतीहि कारणे असोत संघराज्याचा सिद्धांत मात्र त्यामुळे खोटा ठरतो.

अधिकार विभाजनाशीच संलग्न अशी केंद्र व घटक राज्यांनी परस्परांपासून स्वतंत्र असण्याची जी आवश्यकता हा सिद्धांत प्रतिपादतो तीहि प्रत्यक्षात खोटी ठरते. केंद्रराज्ये व राज्या–राज्यातील परस्परावलंबन ही आजची गरज आहे. या परस्परावलंबनाचा पारंपरिक संघराज्य सिद्धांतात विचारच होत नाही.

राज्याधिकारांची वाटणी निश्चित व व्यावर्तक ( exclusive ) करण्याच्या आग्रहामुळे काही विसंगत गृहीते या सिद्धांतातून निर्माण होतात :

* घटक राज्यांच्या प्रत्येक अधिकारांबाबत प्रत्येक घटक राज्यातील मतदारांच्या मागण्या विभिन्न व स्वतंत्र असतात आणि प्रत्येक घटकराज्याचे हितसंबंध त्याच्या भौगोलिक कक्षांपलिकडे जात नाहीत– हे पारंपरिक सिद्धांतातील स्वतंत्रतेच्या व स्वायत्ततेच्या कल्पनेमागील गृहीत आहे. पण










या उलट अनेक घटकराज्यांचे काही बाबींवर समान धोरण असू शकते किंवा धोरण ठरविताना एकमेकांचा अनुभवहि त्यांना उपयुक्त ठरतो. 'इतर राज्यांतील घडामोडींचा विचार न करता जर प्रत्येक राज्य आपल्या पुरताच विचार करू लागले तर सर्वत्र गोंधळ, गैरव्यवस्था व कालापव्यय होईल' —हे एका अमेरिकन विचारवंताचे मत सर्वच संघराज्यांबाबत सत्य आहे. राज्यांच्या परस्पर सहकार्यार्थ व समानहित संवर्धनार्थ 'आंतर्राज्य सुसंवाद ( coordination ) समिती' नेमण्याचा अधिकार भारतीय घटनेच्या २६३ व्या कलमान्वये राष्ट्रपतीस आहे व त्यानुसार १९५२ साली 'केंद्रीय आरोग्य समिति' व सर्व घटकराज्यांसाठी स्थानिक स्वराज्यासंबंधीचे धोरण आखण्यासाठी १९५४ साली 'केंद्रीय स्थानिकशासन समिति' नेमण्यात आली होती. याचा अर्थच हा की प्रत्येक राज्यातील मतदारांच्या अपेक्षा पारंपरिक सिद्धांताचे पुरस्कर्ते समजतात तितक्या विभिन्न नसतात आणि आखून दिलेल्या भौगोलिक मर्यादांपलिकडेही घटकराज्यांचे हितसंबंध जाऊ शकतात. अनेक समान हितसंबंध विभिन्न राज्यातील मतदारांना जोडू शकतात. ही शक्यता नसती तर राष्ट्रव्यापी कार्यक्रमांवर अधिष्ठित राजकीय पक्ष अस्तित्वात आलेच नसते. अशा प्रकारच्या समान हितसंबंधांचे बंध जेवढे अधिक व बळकट तेवढे त्या संघराज्यात स्थैर्य व ऐक्य अधिक. पण ते बंध संघराज्याच्या पारंपरिक सिद्धांतात मात्र बसत नाहीत.

अर्थात सर्वच बाबतीत हे शक्य होत नाही. घटक राज्यांच्या अधिकारांबाबतच काय पण केंद्राच्या आधीन असलेल्या बाबींसंबंधीहि अशी एकवाक्यता कित्येकदा आढळत नाही. इथे संघराज्य-सिद्धांताच्या दुसऱ्या गृहीतावद्दल आक्षेप निर्माण होतो. ते गृहीत असे की :—

* केंद्राधीन अधिकारांबाबत केंद्राकडून सर्व घटकराज्यांच्या मागण्या व अपेक्षा सारख्याच असतात. प्रत्येक बाबीवरील केंद्राचा कायदा सर्व घटकराज्यांसाठी समानच असतो. भौगोलिक वा अन्य विभिन्नतेशी त्याचा सापेक्ष संबंध नसतोच. *

पण या उलट अनुभव असा येतो की घटकराज्यांच्या केंद्राकडून असलेल्या अपेक्षा विभिन्न व स्थलकालसापेक्ष असतात. या मागण्यांमधील अंतर वाढले आणि त्यात केवळ राज्यमर्यादांतर्गत संकुचित हितसंबंधांचे आधिक्य झाले म्हणजे फुटीर वृत्ती बळावतात हा प्रत्यय सर्वच संघराज्यातून येतो.

शासनाच्या दोन्ही पातळ्यांचे मतदारसंघ वेगळे असले तरी मतदार तेच असतात. केंद्र व राज्ये दोघांचेहि निर्णय एकाच लोकसमुदायावर परिणाम करीत असल्यामुळे त्या निर्णयांचा परस्परांवर परिणाम झाल्याविना राहू शकत नाही. ती परस्परांवर निर्णय लादणार नाहीं कदाचित पण हा परिणाम साधण्याचे अनुनय, प्रभाव, तडजोड इत्यादी मार्गसुद्धा असतातच.

दुसरे असे की की घटक राज्यें व केंद्र यांच्या निश्चित अधिकारांची जाणीव सर्वच मतदारांना असते असे नाही. आणि जरी असली तरी आपल्या मागण्या नोंदवितांना संबंधित शासनयंत्रणेकडेच त्या नोंदवाव्यात हा विवेक त्यांच्याकडून नेहमी राखला जातोच असेही नाही. केंद्र व राज्ये यांच्या मर्यादा लक्षात यायला व राहायला फार मोठ्या राजकीय परिपक्वतेची व संस्कारितत्वाची आवश्यकता असते. घटक राज्यांच्या कक्षेत नसलेल्या मागण्या मतदार घटकराज्याच्या शासनासमोर मांडतात, शासन त्यांना 'केंद्राकडे जा' असे सांगून धोका पत्करण्याऐवजी केंद्राकडे शिफारस करण्याचे आश्वासन देते. स्वाभाविकच या 'शिफारसी' केंद्राच्या स्वायत्ततेला मारक ठरतात, असे 'दबाव' उभयतांकडून परस्परांवर प्रत्यही येतच असतात. मग सैद्धांतिक संपूर्ण स्वायत्तता व स्वतंत्रता उरते कुठे ?

केंद्र-राज्ये व राज्य-राज्य यांच्यातील संबंध समानतेचे असतात— हा या सिद्धांतातील दुसरा भ्रम आहे. उपरिनिर्दिष्ट केंद्रीकरणातून केंद्राचे श्रेष्ठत्व व घटक राज्यांचे दुय्यमत्व प्रस्थापित होतेच. एवढेच नाही तर काही घटक राज्यांचेही प्रत्यक्षात इतर राज्यांवर वर्चस्व गाजत असते. केंद्र-राज्ये यांची अधिकारक्षेत्रे सुरवातीला जरी घटनान्यस्त










अधिकारांच्या याद्यांनुसार ठरत असली व तत्वतः जरी केंद्र व इतर सर्व राज्ये यांचा दर्जा व प्रतिष्ठा समान असला, तरी नंतर घटकराज्याची लोकसंख्या, त्या प्रमाणात संसदेतील त्याचे प्रतिनिधित्व, भौगोलिक आकारमान व तज्जन्य आर्थिक संपन्नता वा विपन्नता प्रादेशिक संस्थांचे सामर्थ्य व संघटन नेतृत्व, संघराज्यातील राजकीय पक्षांची रचना, घटक राज्यातील पक्षांचे बलाबल इत्यादि असंख्य गोष्टींवरून त्या त्या संघराज्याची प्रतिष्ठा ठरत असते. व त्याचे वर्चस्व या प्रतिष्ठेच्या समप्रमाणात असते.

केंद्राचे बरेच निर्णय अनेक संघराज्यातून समर्थ व मोठ्या घटकराज्यांच्या बाजूचे आढळतात हा केवळ योगायोग नव्हे. राज्या-राज्याच्या विभिन्न स्वार्थसिद्धी (bargaining) क्षमतेचा परिणाम केंद्राच्या निर्णयावर होतच असतो. भारतीय संसदेत संख्येने अधिक असणारे उत्तरेचे व पश्चिमेचे प्रतिनिधी दक्षिणेच्या व पूर्वेच्या हितसंबंधाच्या नेहमी आड येतात ही तक्रार यामुळेच दिवसेदिवस वाढत चालली आहे.

श्री. प्रभाकर पाध्यांनी 'केसरी'मधील आपल्या (१५-११-७०) लेखात सुचविलेला लहान राज्यांचा तोडगा उचित वाटतो. ते म्हणतात : पुढाऱ्याचा प्रांत जेवढा मोठा तेवढं त्याचं दिल्लीला वजन मोठं . . . सरदार पनिक्करांनी सुचविलेलं उत्तर प्रदेशाचं विभाजन सरदार पटेलांना मान्य न होऊ शकल्यामुळे उत्तर प्रदेश तसाच अवजड व अवाढव्य राहिला. जयप्रकाशांना उद्धृत करून ते पुढे म्हणतात : भारताचे सर्व प्रधानमंत्री उत्तर प्रदेशचेच होते – आहेत हा केवळ योगायोग नाही. या प्रचंड प्रांताचे शंभर खासदार संसदेवर आपले भरताड वजन हवे तसे टाकू शकतात . . . प्रदेशाची प्रमुख भाषा लक्षात घेऊन राज्यपुनर्रचना झालीच आहे – उपभाषा, उपसंस्कृती लक्षात घेऊन अजून लहान राज्येहि निर्मिली जावीत. –म्हणजेच तेलंगण, विदर्भ, कोकण, ठिकठिकाणचे आदीवासी आणि स्वतंत्र राज्यांसाठी ज्या ज्या मागण्या आज होत आहेत त्या पुरविणे या अस्थिरतेवरील एकमेव मार्ग आहे. त्यामुळे काही विशिष्ट राज्यांची दादागिरी संपुष्टात येईल, राज्या-राज्यांमधील संबंध सुधारतील कारण त्यांच्यातील परस्परावलंबन वाढेल– इतर राज्यांच्या भावनांचा व विचारांचा प्रत्येक राज्य आदर करील. परस्परांबद्दल त्यांना विश्वास वाटेल– आज मोठ्या राज्यांबद्दल लहान राज्यांच्या मनात विश्वास नाही. आकार व लोकसंख्या याबाबत घटकराज्यात समानता राखण्याचे प्रयत्न संघराज्यांमधे अपवादात्मकच म्हणावे लागतील.

घटक राज्यांची आर्थिक कुवत जेव्हा कमी अधिक असते तेव्हा तर हा फरक जास्तच स्पष्ट होतो. कमकुवत राज्ये केंद्रावर जास्त प्रमाणावर विसंबून असतात आणि या विसंबनातूनच त्याच्या सैद्धांतिक स्वायत्ततेचा बळी जातो. लहान राज्यांची संघटित फळी उभारणे हाही मार्ग संघराज्यात अवलंबिला जातो पण तोहि संघराज्य-सिद्धांत-संमत नाही. "आपले अधिकार सुरक्षित राखायचे असतील तर राज्यांनीच कर्तव्यदक्ष राहाणे आवश्यक आहे. राज्यांना व तेथील नेतृत्वाला आपल्या जबाबदारीची जाणीव हवी. जर त्यांना तिचा विसर पडला वा त्यांनी ती टाळली तर त्या क्षेत्रात पर्याय म्हणून केंद्रशासनाला कार्य करावेच लागेल. राज्याने दुर्लक्ष करून पोकळी निर्माण केली तर लोकमताच्या दबावामुळे केंद्राला ती भरून काढावीच लागेल" –हे प्रेसिडेन्ट विल्सनचे उद्गार पूर्णतया सत्य आहेत. फक्त प्रश्न असा पडतो की मग संघराज्याच्या शास्त्रोक्त (classical) सिद्धांतातील चिरंतन अधिकारवाटणीचे काय ?

संघराज्यातील संसदेच्या द्वितीय गृहाचे सदस्य घटक राज्यांच्या हितसंबंधाचे संरक्षक असावेत ही अपेक्षासुद्धा सर्वच संघराज्यात पूर्ण होतेच असे नाही. रशिया किंवा स्वित्झर्लंडमधील द्वितीय गृहांना या दृष्टीने प्रथमगृहापेक्षा वेगळे अधिकार वा कर्तव्ये दिलेलीच नाहीत. द्वितीय गृहात घटक राज्यांना समान सदस्यत्व देऊन त्यांच्या समान दर्जाला मान्यताही सर्वच संघराज्ये देत नाहीत. रशियन संघराज्यात आकार व लोकसंख्येनुसार घटक राज्यांच्या चार श्रेणी ठरवून प्रत्येक श्रेणीला विभिन्न प्रतिनिधित्व 'सोविएट ऑफ नॅशनॅलिटिज'








मध्ये दिलेले आढळते. भारतातील राज्यसभेतही घटकराज्यांना त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणातच प्रतिनिधित्व मिळते. स्वाभाविकच तिथेही लहान घटकराज्ये दुय्यम ठरतात. अनेक लहान राज्ये झाली म्हणजे त्यांना समान प्रतिनिधित्व आपो-आपच प्राप्त होईल.

संघराज्यातील अस्थैर्यास व फुटीर वृत्तीस राज्या-राज्यातील आर्थिक-राजकीय विषमता बव्हंशी कारणीभूत होत असते. लहान राज्यांचा असंतोष, असमाधान, आपली उपेक्षा होते आहे ही जाणीव त्यांना संघराज्यापासून फुटून जाण्याचा विचार करायला लावते. ज्या आर्थिक व राजकीय नवरचनेची सुरवात संघराज्यप्रस्थापनेतून होते तिचा परिणाम (विशेषतः आधी सार्वभौम असलेल्या घटकराज्यांच्या बाबतीत) असा होतो की राज्याराज्यातील आवक जावक व आर्थिक देवाण घेवाण यावरील निर्बंध नाहीसे होतात. त्यांच्यातला व्यापार सुलभ होतो. मजूर व भांडवल यांचे चलन वलन (mobilization) शक्य होते. स्वाभाविकच आर्थिक दृष्ट्या मागासलेल्या व विपन्न असलेल्या घटकराज्यातून संपन्न, प्रगत व औद्योगीकृत राज्यात मजूर व भांडवल जाऊन स्थिरावतात. राष्ट्राच्या उत्पादनक्षमतेवर या स्थित्यंतराचा उपकारक परिणामही होत असावा, पण हेही नाकारता येत नाही की लहान व आर्थिक दृष्ट्या अप्रगत राज्यांवर त्याचा विपरीत परिणाम झाल्याशिवाय राहात नाही.

संघराज्याची मिळून काही सांस्कृतिक, सामाजिक, आर्थिक व प्रशासकीय 'प्रमाणे' (Standards) प्रस्थापित होत असतात. परस्परांच्या समीप व सन्निध आल्यामुळे राज्यात पैशाची व माणसांची देवाण घेवाण होते. मग तुलना होणे अपरिहार्य ठरते. आपण मोठ्या घटक राज्याची बरोबरी करू शकत नाहीत किंवा आपल्यावर आपल्या उणेपणामुळे काही गोष्टी (उदा. भाषा वा धर्म) लादल्या जात आहेत ही जाणीव जर लहान घटक राज्यांना झाली (आणि तशी ती होतेच) तर ती वैफल्यग्रस्त होतात. आक्रमक, हिंसक बनतात. मोठ्या राज्यांकडून लहानांवर येणारा दबाव यशस्वी झाला की राष्ट्रीय एकात्मतेसारखे प्रश्न उरत नाहीत. न झाला तर संघराज्यातच अनवस्था होते. एकंदरीत पारंपरिक सिद्धांताच्या दृष्टीने मोलाची असलेली घटकांची अस्मिता राष्ट्रीय मानदंड (norms) स्वीकारताना वा त्यांना प्रतिकार करताना खर्ची पडते हे सत्य सार्वत्रिक आहे.

आर्थिक प्रगतीच्या विभिन्न पातळ्यांवर असलेल्या घटक राज्यांमधील विषमता व अंतर कमी करण्याच्या दृष्टीने संघराज्याच्या यशाबद्दल अभ्यासक साशंक आहेत. नियोजनाची पराकाष्ठा करून प्रयत्न होत आहेत. कदाचित् केंद्राच्या कमाल नियंत्रणातून– हस्तक्षेपातून– ते उद्दिष्ट पुढे शक्य होईलहि पण मग संघराज्याचा सिद्धांत त्यावेळी अगदीच भूतकालीन बाब झालेला असेल.

सारांश, संघराज्याचा पारंपरिक सिद्धांत घटक राज्यांच्या संघटनाची वा एकत्रीकरणाची, अथवा संघराज्य निर्मितीप्रसंगी केंद्र-राज्ये यातील करारात्मक अधिकारवाटणीची तात्त्विक मीमांसा फक्त करतो, त्याच्या बदलत्या साक्षात् कार्यवाहीबद्दल (operation of variables) काहीच सांगू शकत नाहीत.

---












श्री. शारदा मो. देशमुख

# संन्याशाचा संसार

ज्ञानेश्वरांच्या वडिलांचे नाव विठ्ठलपंत व आईचे नाव रुक्मिणीबाई. विठ्ठलपंतांचे घराणे पवित्र व सदाचारसंपन्न. विठ्ठलपंतांना बाळपणीच शास्त्राध्ययनाचे धडे मिळाले होते. वेद व्याकरण, काव्य यांचे पाठांतर अल्पवयातच होऊन ते निपुण शास्त्रवक्ते बनले होते. मुळातच स्वभाव वैराग्यशील असल्याने ते तीर्थयात्रेस निघाले. द्वारकेपासून सर्व तीर्थ करीत करीत ते आळंदीस आले. आळंदीच्या सिद्धेश्वरपंत कुलकर्ण्यांनी त्यांना आग्रहाने आपल्या घरी भोजनास नेले. त्या रात्री पांडुरंगाने स्वप्नात येऊन आपली कन्या विठ्ठलपंतास द्यावी असे सिद्धेश्वरपंतास सांगितले. सिद्धेश्वरपंतांनी आपले स्वप्न प्रातःकाळी विठ्ठलपंतांस सांगितले व आपला मनोदयही स्पष्ट केला. पण आपण रामेश्वरास जात आहोत, विवाहाविषयी आपणास प्रभूंची आज्ञा नाही असे विठ्ठलपंत म्हणाले. आश्चर्याची गोष्ट अशी की त्या रात्री विठ्ठलपंतांस स्वप्न पडून त्यात देवाने त्यास या मुलीशी विवाह करण्याची आज्ञा केली. सकाळी विठ्ठलपंतांनी सिधोपंतांस स्वप्न सांगितले आणि विवाहाची तयारी दाखविली. सुमुहूर्तावर लग्न लागले.

दिंड्या पताका घेऊन जाणारे वैष्णवांचे भार पाहून नवविवाहित विठ्ठलपंतांना चैन पडेना. मग सारीच मंडळी पंढरपुरास गेली. तेथून विठ्ठलपंत एकटेच रामेश्वरास गेले. यात्रेचा संकल्प पुरा करून परत आळंदीस आले व तेथून पत्नीला घेऊन आपेगावास गेले. कालान्तराने वृद्ध मातापितरे वैकुंठवासी झाली. प्रपंचाचा भार विठ्ठलपंतांवर पडला. उदासीन, विरक्त वृत्तीच्या जावयास सासऱ्याने आळंदीला आणले. पण विठ्ठलपंतांची संसारातील आसक्ति सुटत जाऊन विरक्ति वाढत चालली. संन्यास घ्यावासा वाटू लागला. मधून मधून ते पत्नीला परवानगीही मागत. आणि एका रात्री त्यांनी एका वस्त्रानिशी काशीची वाट धरली. तेथे शास्त्राध्ययन व वेदान्तचिंतन करीत असता त्यांचे गुरु रामेश्वराच्या यात्रेच्या निमित्ताने आळंदीस आले. रुक्मिणीबाई त्यांच्या दर्शनास आल्या असता त्यांनी त्यास 'पुत्रवती भव' असा आशीर्वाद दिला व तो खोटा होण्याची आपत्ति आलेली पाहून त्यांनी रुक्मिणीबाईची सर्व चौकशी केली. आपला चैतन्याश्रमशिष्य तोच विठ्ठलपंत अशी खात्री होताच ते तडक यात्रा टाकून काशीला परत गेले. आणि त्यांनी विठ्ठलपंतास परत गृहस्थाश्रम स्वीकारण्याची आज्ञा केली.

विठ्ठलपंतांनी संन्यासाश्रमातून पुन्हा गृहस्थाश्रमात प्रवेश केला. शिष्ट ब्रह्मवृंदाने त्यांना वाळीत टाकले. आप्तांनी उपेक्षा केली आणि जनाने बहिष्कार घातला. अशा विपन्नावस्थेत बारा वर्षे लोटली. नंतर निवृत्तिनाथांचा जन्म झाला व पुढे तीन तीन वर्षांच्या अंतराने आणखी तीन अपत्ये झाली. योग्य वेळी निवृत्तिनाथांच्या उपनयन संस्काराचा प्रश्न आला. मुलांच्या अभ्युदय-निश्रेयसासाठी त्यांचा व्रतबंध व्हावा म्हणून विठ्ठलपंत आळंदीच्या ब्रह्मवृंदाला शरण गेले. हेतु असा होता— 'शुची हे करणे पतितांसी ।' पण आळंदीच्या वैदिक, शास्त्रज्ञ आणि पुण्यश्लोक ब्राह्मणांना विठ्ठलपंत आणि त्यांचे कुटुंब यांना शुद्ध करून घेण्यास धर्मग्रंथात आधार आढळला नाही. त्यांनी विठ्ठलपंतांना 'देहान्त प्रायश्चित्त' सांगितले.

विठ्ठलपंतांची ही चरित्रविषयक माहिती नामदेवांनी लिहून ठेवली आहे व ती खरी असल्याचे येथे गृहीत धरले आहे. आणि त्यावरून तत्कालीन धर्मशास्त्रज्ञ पंडितांनी विठ्ठलपंतास दिलेला हा निर्णय कितपत धर्मशास्त्रास अनुसरून आहे व विठ्ठलपंतांच्या आयुष्याची अशी ओढाताण का झाली हे येथे पहावयाचे आहे.








वास्तविक हिंदु धर्मशास्त्राने गृहस्थाश्रमाची फार थोरवी गायिली आहे. नव्हे; आरंभी वैदिकांना संन्यासमार्ग तितकासा मान्य नव्हता. इं हा यतींचा वैरी होता असे तैत्तिरीय संहिते- ( ६.२-७-५ ) वरून कळते. इंद्राने यतींना मारून लांडग्यांना चारले. ( ऐतरेय ब्राह्मण ७-२८ ) काही यती शरण आल्याने इंद्राने त्यांचे संरक्षण केले अशा प्रकारचा एक उल्लेख मिळतो. ऋषि आणि मुनी हे शब्द आज आपण समानअर्थी वापरतो पण वेदामध्ये प्रमुख आहेत ती ऋषींची नावे. वेदकाळातील ऋषी सामान्यतः विवाहित गृहस्थाश्रमी असत. आर्य हे यज्ञसंस्थेचे अध्वर्यु असल्याने त्यांनी गृहसंस्थेस उचलून धरल्याचे आढळते. औपनिषद् ऋषी स्मृत्युक्त संन्यासी होते असे म्हणता येणार नाही. कोणताही मोठा माणूस संन्यासी असल्याचे वर्णन प्राचीन ग्रंथात नाही. रामायण, महाभारतात वानप्रस्थ आढळतात पण संन्यासी आढळत नाहीत. हिंदुधर्माने गृहस्थाश्रमाला जे महत्त्व दिले होते त्याच्या सामर्थ्याचा प्रत्यय बौद्ध धर्माच्या चळवळीच्या वेळी प्रत्ययास आलेला दिसतो. जग आणि जीवन दुःखमय आहे म्हणून सर्वसुखाचा परित्याग करण्याच्या बौद्ध धर्मातील अतिरिक्त कल्पनांशी टक्कर देण्याचे सामर्थ्य हिंदु-धर्मातील गृहस्थाश्रमाच्या महत्त्वात दडलेले होते. प्राचीन काळापासून हिंदुधर्मातील ऋषिमुनींनी आणि लेखकांनी गृहस्थाश्रमाचे गोडवे गाईले आहेत. ( मनु. ३, ७७-७८; ६, ८९-९० विष्णु-धर्मसूत्र ५९, २९; महाभारत शांतिपर्व २७०, ६-११; रामायण अयोध्याकांड १०६, २, पुराणांनीही हेच केले. पहा– History of Dharmashastra Vol. II PP. 425–426 and 540–541) नुसत्या धर्मशास्त्राने गृहस्थाश्रमाची थोरवी सांगितली असेही नाही. कालिदासही तेच म्हणतो. ( रघुवंश ५–१०, शाकुन्तलातही तो तेच म्हणतो. )

बौद्धानंतर संन्यासाश्रमाचा प्रचार जारीने सुरू झाला. संन्यासमार्ग श्रेष्ठ होय हा विचार बौद्ध–जैनात जास्त प्रभावी होता. गृहस्थाश्रमाचे श्रेष्ठत्व व प्रत्येकाने अनृणी होण्याकरता काही ऐहिक कर्तव्ये बजावण्याची कल्पना हिंदूत होती. परंतु शंकराचार्यांनंतर संन्यासविचाराचा फार मोठा पगडा सर्वांवर बसला होता आणि त्यामुळे संसाराबाबत उदासीन वृत्ति ही हिंदूतही आदरणीय बनली. बाराव्या तेराव्या शतकात येथे संन्यासयुग किंवा शरीरदमन-युग चालू होते व मोक्षप्राप्तीसाठी सर्वसंगपरित्याग करून संन्यासच घेतला पाहिजे असा शंकराचार्यांच्या मताचा समाजमनावर पगडा होता. ज्ञानेश्वरांचे वडील विठ्ठलपंत तत्कालीन विचारप्रवाहाच्या अधीन झाले यात शंका नाही. तथापि हिंदुधर्माच्या अभ्यासाचा प्रभावही त्यांच्या मनातून गेला नव्हता. धर्मतत्त्वांचा अभ्यास आणि तत्कालीन विचारप्रवाह या दोघांनी विठ्ठलपंतांच्या आयुष्याची ससेहोलपट केली असे वाटते.

विठ्ठलपंताचे सबंध चरित्र वाचले की त्यांच्या मनातील गृहस्थाश्रम व संन्यास यांची गुंतागुंतीची वीण दिसू लागते. मूलतःच वैराग्यशील पण भावना-प्रधान हळवा स्वभाव. निष्ठा, श्रद्धा हे मनाचे वैशिष्टय म्हणून प्रथम सिधोपंतांच्या व स्वतःच्या स्वप्नांवर श्रद्धा ठेवून संसार स्वीकारला; पण विरक्तीने उचल खाल्ली नि तो सोडला. दुसऱ्यांदा गुरूची आज्ञा शिरसावंद्य मानली आणि संन्यास सोडून संसार स्वीकारला. प्रवृत्ति आणि निवृत्ति यांच्या हेलकाव्यात विठ्ठलपंतांच्या जीविताचा निर्णय समाजाच्या हातात गेला. स्वतःच्या आयुष्याविषयी निर्णय घ्यायला मनाचा जो एकारलेपणा लागतो, थोडासा आग्रह लागतो त्याचा अभाव असल्याने त्यांच्या संसाराचे तारू हेलकावे खात राहिले आणि अखेर समाजाने अवेळी त्यांचा घात केला!

पुत्रप्राप्तीपूर्वी आणि पत्नीच्या संमतीवाचून विठ्ठलपंतानी संन्यास घेतला होता. मनूच्या मते (अध्याय ६ : ३५ ते ३७) तीन ऋणे न फेडता जो संन्यास घेतो तो अधोगतीस जातो. देव, ऋषी व पितर अशा तीन ऋणातून मुक्त होण्यासाठी यथा-शास्त्र वेदांचे अध्ययन करून, विवाह करून शुद्ध पुत्रसंतति निर्माण केल्यावर यथाशक्ति यज्ञांचे अनुष्ठान करावे व मगच मोक्षासाठी ब्राह्मणाने संन्यासदीक्षा घ्यावी. याज्ञवल्क्याचेही असेच म्हणणे आहे. (श्रीयाज्ञवल्क्यस्मृति मिताक्षरासह पृ. २९९)








अर्थात संन्यास घेण्याचा अधिकार व परिस्थिति नसताना विठ्ठलपंतांनी संन्यास घेतला होता. गुरूने जेव्हा सर्व चौकशी केली तेव्हा विठ्ठलपंतांचा संन्यास खोटा आहे. शास्त्रविहित नाही हे त्यांच्या लक्षात आले म्हणून त्यांनी विठ्ठलपंताना गृहस्थाश्रम स्वीकारण्याची आज्ञा केली. या प्रसंगाचे वर्णन चरित्रकार नामदेव असे करतात– आपला खोटेपणा सिद्ध होताच विठ्ठलपंतांनी कानकोंडे होऊन श्रीपादांच्या चरणावर मस्तक ठेवले. तेव्हा श्रीपाद त्यांना आश्वासन देऊन म्हणाले, आता पत्नीचे ग्रहण कर. अविधी कर्माचे भय धरू नकोस. स्वदेशाला जा आणि सुखरूपपणे स्वधर्म चालव. " (ज्ञानेश्वरांची आदि अ. १२२८ – ४ते ८ ) गुर्वाज्ञेप्रमाणे विठ्ठलपंतांनी गृहस्थाश्रम स्वीकारला. आता येथे असा प्रश्न मनात डोकावतो की यतीला पती बनवावयाचे होते तर गुरूने (विठ्ठलपंतांना दीक्षा देणाऱ्या गुरूचे नाव रामानंद असावे असे काही संशोधक मानतात; काही मानीत नाहीत. प्रस्तुत विवेचनाच्या दृष्टीने विठ्ठलपंतांना दीक्षा देणारा यति मोठा धर्मशास्त्रज्ञ असावा इतकेच महत्त्वाचे आहे.) त्याला पापक्षालनासाठी प्रायश्चित्त का दिले नाही ? त्यांना समाजाच्या पुढील वागणुकीची व छळाच्या बहिष्काराच्या प्रवृत्तीची कल्पना नव्हती काय ? बरे, विठ्ठलपंतांनीही संसारास पुन्हा सुरुवात करतांना प्रायश्चित्ताचा विचार का केला नाही ? मुलांच्या मुंजीच्या वेळीच त्यांना प्रायश्चित्ताची का आठवण झाली ?

आपल्या शिष्याला गृहस्थाश्रम स्वीकार म्हणून आज्ञा करणाऱ्या रामानंदांना शास्त्रार्थ माहीत नव्हता किंवा त्यांनी तो मुद्दाम डावलला असे गृहीत धरणे चूक आहे. स्वतः विठ्ठलपंतांना शास्त्राध्ययनाचे धडे बालवयातच मिळाले होते. वेदादिकांचे पाठांतरही त्यांनी अल्पवयातच केले होते. त्यामुळे गृहस्थाश्रम स्वीकारण्याची आज्ञा करणारा गुरू आणि प्रत्यक्ष गृहस्थाश्रम स्वीकारणारा शिष्य दोघेही एतद्‌विषयक धर्माज्ञेचे जाणकार होते. शिवाय विठ्ठलपंत मूळातले पती होतेच, यति होते नि नंतर पती होण्याचा विचार केला असेही नव्हे. गृहस्थाचा भावनावेगात संन्यासी बनला होता. त्या भावनावेगाला आवर घालून आद्य कर्तव्यांची जाणीव देणे गुरूचे कर्तव्यच होते. ते त्याने केले. किंबहुना रामानंदांच्या मनात गृहस्थाश्रमाच्या पवित्रतेची तीव्र जाणीव होती म्हणूच त्यांनी विठ्ठलपंतांना परत जाण्याची आज्ञा केली. स्वतः विठ्ठलपंतांना स्मृति माहीत होत्या आणि स्मृतींच्या उल्लंघनाचा दंडही माहीत होता. हा दंड देहान्ताचा असता तर ते परतलेच कशाला असते ? आणि चार मुलांना जन्म देऊन त्यांना पोरके करण्याचे पातक त्यांनी कशाला केले असते ? ज्याला मुळातच संसार करण्याची इच्छा नव्हती त्याने दारुण भविष्याला टक्कर देण्यासाठी व पोरकी करण्यासाठी प्रजोत्पत्ति केलीच नसती. आणि आपल्याला शुद्ध करून घेणारे प्रायश्चित्त शास्त्रात नाही अशी खात्री असती तर ते उशीरा का होईना आळंदीच्या ब्रह्मवृंदांकडे तशी याचना करायला गेलेच नसते. तेव्हा विठ्ठलपंताना आणि रामानंदानाही खरा शास्त्रार्थ माहीत होता म्हणून त्यांच्या दृष्टीने आणि स्वतः विठ्ठलपंताच्या दृष्टीनेही ते पतित नव्हते. गुन्हेगार नव्हते. म्हणून संन्यासाकडून गृहस्थाश्रमाकडे परतताना त्यांना प्रायश्चित्त विचारण्याची जरूर वाटली नाही. यतिधर्माचा स्वीकार करतांना त्यांनी शास्त्रार्थ डावलला म्हणून खऱ्या अर्थाने ते यतीच नव्हते. शुद्धीकरणाचा प्रश्न म्हणूनच त्यांच्या मनात तत्काळ उद्‌भवला नाही.

आळंदीला परत येऊन विठ्ठलपंत जननिंदेचा अक्षय विषय बनले. गावाबाहेरील झोपडीत हे पतिपत्नी आपले बहिष्कृत आयुष्य जगत राहिले. अशा अवस्थेत थोडा काळ नव्हे चांगली बारा वर्षे काढली. त्यांना रुक्मिणीबाईच्या आईवडिलांचा आधार किती काळपर्यंत होता हे चरित्रकार सांगत नाहीत. तथापि या बारा वर्षांच्या दीर्घ मुदतीत बहिष्कृत आयुष्य विठ्ठलपंत निर्धाराने जगले. मनाला ग्वाही ठेवून शुद्धपणे जगले. खोटया शुद्धीसाठी ब्रह्मवृंदाला शरण गेले नाहीत. पुढे एका मागोमाग चार अपत्यांचा जन्म झाला आणि










त्यांच्या संस्काराचा प्रश्न पुढे आला. पित्याच्या हृदयात कालवाकालव झाली. आपण अकारण बहिष्कृत झालो असलो आणि आजवर शुद्धिबद्दल बेफिकीर असलो तरी ही बेफिकिरी मुलांच्या आयुष्यात आड येऊ नये म्हणून त्यांच्यावर संस्कार व्हावेत असे त्यांना वाटले. आता ब्रह्मवृंदाला शरण जाण्यावाचून गत्यंतर नव्हते. मुलांसाठी त्यांनी प्रायश्चित्त घ्यायचे ठरवले. पण ब्रह्मवृंदाने त्यांचा घात केला. देहान्ताचे प्रायश्चित्त सांगितले आणि त्यांनीही इहलोकाला विटून आत्मघात केला. वास्तविक पाहता प्रायश्चित्त पापक्षालनाठी करावयाचे असते. धर्मशास्त्रात सर्व पापांपासून मुक्त होण्याकरिता प्रायश्चित्ते सांगितलेली आहेत. ब्रह्महत्येसारख्या महापातकापासून मुक्त करणारी देखील प्रायश्चित्ते आहेत. मग संन्याशाने गृहस्थाश्रम स्वीकारला, संतती निर्माण केली तर त्याला प्रायश्चित्ताने शुद्ध करून घेता येऊ नये, हे आश्चर्य आहे. आणि खरे पाहता धर्मशास्त्र ब्राह्मणांचे पक्षपाती होते. कितीही गंभीर स्वरूपाचा गुन्हा केला तरी ब्राह्मणाला देहान्त शासनाची भीति नव्हती. मनुष्याच्या विशिष्ट प्रकारच्या चुकांस 'पाप' अशी संज्ञा असून ते नष्ट होण्यासाठी प्रायश्चित्ते शास्त्रकारांनी सांगितली आहेत. काम, क्रोध आणि लोभ यांच्या आहारी गेल्यामुळे मनुष्याकडून अनेकविध पापकर्मे घडतात. (विष्णुस्मृति ३३·१) प्रायश्चित्ताच्या आचरणामुळे पाप करणाराच्या अंतरात्म्यास शांति मिळून त्याच्या अपकृत्यामुळे रुष्ट झालेले लोकही प्रसन्न होतात. (याज्ञवल्क्यस्मृति ३-२२०) मनूचेही याविषयी असेच मत आहे. (मनुस्मृति ११·२३०) यावरून समाजाची आणि व्यक्तीची सुधारणा करणे हे प्रायश्चित्तांचे ध्येय आहे, हे स्पष्ट होते. 'तीन वेदज्ञ ब्राह्मणांनी सांगितलेले प्रायश्चित्त केले तरी तेवढ्यानेही ब्रह्महत्येचा दोष नाहिसा होतो' असे मनु सांगतो. (११.८५) असे असता विठ्ठलपंतांच्या वाट्याला मात्र देहान्ताचे प्रायश्चित्त आले!

मनु व याज्ञवल्क्य या ऋषींनी आपापल्या स्मृतिग्रंथांमध्ये सामाजिक स्थैर्य, कौटुम्बिक हितसंबंध आणि वैयक्तिक प्रेरणा यांच्या अनुषंगाने अनेक लहानमोठ्या प्रश्नांची चर्चा करून काही नियम घालून दिले. व्यक्ति आणि समाज यांचे संबंध परस्परपूरक रहावेत असा हेतु हा आचारधर्म आखून देण्यामागे होता. या बंधनांचे उल्लंघन करणारांना स्मृतींनी प्रायश्चित्तादि कमी अधिक कडक शिक्षा सांगितल्या असल्याकारणाने स्मृतिवचनांना कायद्याचे स्वरूप आले. मनुयाज्ञवल्क्यांच्या कालापासून चालत आलेली परंपरा मध्ययुगातसुद्धा अबाधित राहिल्यामुळे यादव कालखंडातही धर्माधिष्ठित समाजकारणाहून कायदा वेगळा मानला जात नव्हता. (यादवकालीन महाराष्ट्र– पृ. १०२) मनुस्मृति व याज्ञवल्क्यस्मृति या दोन प्रमुख ग्रंथांवर कालाच्या ओघात बऱ्याच टीका रचल्या गेल्या. तसेच काही निबंधही ग्रंथित झाले. परंतु समाजाच्या श्रद्धेला धक्का लागेल या भीतीने ऋषितुल्य स्मृतिकारांच्या वचनामध्ये कोणताही बदल करणे मध्ययुगीन निबंधकारांना शक्य नव्हते. समाजव्यवस्थापनासाठी शास्त्राने वेळोवेळी समाजाच्या रीतिरिवाजांशी जुळते घेतले. काही सामाजिक समस्यांवर मिताक्षरेत सूचना सुचविलेल्या आढळतात. कल्याणीचा विज्ञानेश्वर (इ. स. १०७० ते ११००) याच्या मिताक्षरेचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. महत्त्वाच्या सामाजिक प्रश्नांची चर्चा मिताक्षरेत सांगोपांग केलेली आहे. त्यामुळे न्यायदानाच्या कामी भारतात बहुधा सर्वत्र मिताक्षराच प्रमाण मानली जात असे. निदान महाराष्ट्रात तरी. (ब्रिटिश न्यायकोर्टे स्थापन झाली तरी त्यांनी मुंबई इलाख्यात मिताक्षरेचेच प्रामाण्य मानले असे इतिहास सांगतो.) तेव्हा आळंदीच्या ब्रह्मवृंदाने विठ्ठलपंतांना प्रायश्चित्त सांगतांना मनु, याज्ञवल्क्य व मिताक्षरा या ग्रंथांचाच विशेषतः मिताक्षरेचाच आधार घेतला असला पाहिजे.

मिताक्षरेत संन्यास सोडून गृहस्थाश्रम स्वीकारणारास प्रायश्चित्त सांगितले आहेच पण इतर स्मृतिकारांनीही अशी प्रायश्चित्ते दिली आहेत.

वसिष्ठाने संन्यास घेऊन पुन्हा गृहस्थाश्रमाच्या स्वीकाराने मैथुनसेवन करणारा साठ सहस्र वर्षे विष्ठेत कृमी होतो असे म्हटले आहे.








पराशरानेही— संन्यासापासून निवृत्त होऊन गार्हस्थ करण्याची इच्छा करणाराने तीन[1] कृच्छ्रे व चांद्रायणे[2] करून जातकर्मादि सर्व संस्कार करावे, म्हणजे तो शुद्ध होतो असे म्हटले आहे. त्याच्यामते ब्राह्मणास षण्मासिक कृच्छ्रानंतर पुन्हा संन्याससंस्कार करावा. यमाच्या मतेही संन्यासापासून च्युत झालेले प्रत्यवसित नव्हेत तर ते सर्वलोकबहिष्कृत होत. ते शक्ति, गुण इत्यादिकांच्या अपेक्षेने चांद्रायण व दोन तप्तकृच्छ्रे यांच्यायोगाने शुद्ध होतात. मिताक्षरा हा सर्वमान्य धर्मशास्त्रीय निबंधग्रंथ होय. या ग्रंथातही याविषयी अगदी निःसंदिग्ध शब्दात प्रायश्चित्त सांगितलेले आहे. मिताक्षराकार म्हणतात— जेव्हा एखादा मनुष्य गृहस्थाश्रमाच्या स्वीकारामुळे संन्यासाश्रमापासून च्युत होतो तेव्हा

---

१. कृच्छ्र — एक प्रकारचे व्रत. हे व्रत तपोरूप असल्याने क्लेशसाध्य असते. तप्तकृच्छ्र — पहिल्या दिवशी तापलेले तूप, तापलेले जल पिऊन राहणे व दुसऱ्या दिवशी उपवास केल्याने दोन रात्रीत तप्तकृच्छ्र संपादन करता येते. मनूने तर (अ. ११ श्लो. २१४) 'पहिले तीन दिवस उष्णजल, नंतर तीन दिवस उष्ण दूध, पुढे तीन दिवस तापलेले तूप आणि शेवटी तीन दिवस नुसते उष्णवायुभक्षण व एकदा स्नान' असे सांगितले आहे.

दुग्धादिकांचे प्रमाण पराशराने असे सांगितले आहे — जल त्रिपल, क्षीर द्विपल, घृत एक पल व उष्णवायु तीन रात्री प्राशन करावा. वायूच्या जागी उष्ण जलाची वाफ घ्यावी. मोठ्या पापापासून सत्वर एकाच कृच्छ्राने मी मुक्त व्हावे अशी ज्याची इच्छा असेल त्याने तीन दिवस प्रातःकाळी हविष्यान्न खाऊन रात्री भोजन करू नये. पुढे तीन दिवस नक्त भोजन करावे. नंतर तीन दिवस कोणापाशी न मागता यदृच्छेने मिळेल ते खाऊन रहावे व शेवटी तीन दिवस उपोषण करावे. जपादि काम नसेल तेव्हा दिवसा उभे रहावे आणि रात्री बसावे. सत्य भाषण करावे. रौरवयोधा या नावाच्या सामाचा जप करावा. त्याचा नेहमी पाठ करावा. त्रिकाल स्नान करावे. 'आपोहिष्ठा' इत्यादि तीन पवित्रवती ऋचांनी अप–उप–स्पर्शन करावे. हिरण्यवर्णा शुचयः पावकाः' इ. आठ ऋचांनी मार्जन करावे. नंतर तर्पण अशा रीतीने करावे 'नमोहमाय मोहमाय महंमाय धन्वये ... चंद्रललटाय कृत्तिवाससे नमः' हेच आदित्याचे उपस्थान व याच मंत्रांनी आज्याहुती द्याव्या. बारा दिवसानंतर चरू शिजवून अग्नयेस्वाहा सोमायस्वाहा अग्नीषोमाभ्यां स्वाहा आणि त्याचप्रमाणे इन्द्राग्निभ्यां इन्द्राय, विश्वेभ्यो देवेभ्यः, प्रजापतये व अग्नये स्विष्टकृते या देवतांच्या चतुर्थ्यन्त नावापुढे स्वाहा शब्द योजून होम करावा व शेवटी ब्राह्मण भोजन घालावे.

२. चांद्रायण करणाऱ्या पुरुषाने मोराच्या अंड्याएवढाले पिंड जसजशी तिथी वाढत जाईल तसतसे वाढवीत खावे. शुक्ल प्रतिपदेपासून सर्व पक्षभर रोज चंद्राची एकेक कला वाढत असते; त्याच्या अनुरोधाने प्रतिपदेच्या दिवशी एक पिंड, द्वितीयेस दोन अशा क्रमाने वाढवीत पौर्णिमेपर्यंत पंधरा ग्रास वाढवावे. पौर्णिमेस पंधरा ग्रास खाऊन कृष्णप्रतिपदेस चवदा, द्वितीयेस तेरा, तृतीयेस बारा असे उतरवीत यावे. चतुर्दशीच्या दिवशी एकच ग्रास खाऊन अमावास्येच्या दिवशी उपास करावा. जेव्हा एखाद्या पक्षात तिथीची वृद्धि होऊन सोळा दिवस अथवा क्षय होऊन चवदाच दिवस येतात तेव्हा ग्रासांचीही वृद्धी अथवा ऱ्हास करावा. गौतमाने या व्रताविषयी विशेष नियम सांगितले आहेत— प्रथम वपन करावे. पौर्णिमेच्या आदल्या दिवशी उपवास करावा. 'आप्यायस्व०' आदि मंत्रांनी तर्पण, आज्य होम, हवीचे अनुमंत्रण व 'यद्देवादेवहेडनं' या चार आणि 'देवकृतस्य' या एका ऋचेने चंद्राचे उपस्थान करावे. घृताचे हवन करावे शेवटी समिधांनी ॐ भः स्वाहा, ॐ भुवः स्वाहा' इ. म्हणून होम करावा व त्याच मंत्राचा उच्चार करून ग्रास घ्यावे. चरु भैक्ष, सातूचे कण, यावक, शाक, दूध, दही, घृत, मुळेफळे उदक ही उत्तरोत्तर प्रशस्त आहेत. पौर्णिमेस पंधरा ग्रास खाऊन सर्व कृष्णपक्षभर उत्तरोत्तर एकेक कमी करीत जावे. अमावास्येच्या दिवशी उपोषण करावे नंतर शुक्ल पक्षात एकेक ग्रास वाढवीत जावे याप्रमाणे एक महिन्यात चांद्रायण सिद्ध होते.










संवर्ताने सांगितलेले प्रायश्चित्त करावे. (सहा महिने न थकता कृच्छ्र करावे मिताक्षरा ३. २८)

मिताक्षरेत जे प्रतिपादन आहे त्याला अनेक धर्मग्रंथांचा आधार आहे.[३] पराशर, वृद्धपराशर, माधवाचार्य, कमलाकरभट्ट, नागेशभट्ट इत्यादि निबंधकारांनीही असाच निर्वाळा दिला आहे. या सर्व धर्मशास्त्रकारांनी संन्याशाला संसाराची इच्छा झाली आणि तसे तो वागू लागला तर त्याच्या पापाचे परिमार्जन कसे करावे हे सांगितले आहे. गृहस्थाचा संन्याशी व त्याचा परत गृहस्थ असे उदाहरण यात नाही त्यामुळे विठ्ठलपंत पतित झाल्याचेच जेथे सिद्ध होऊ शकत नाही तेथे प्रायश्चित्ताचा प्रश्नच उद्भवत नाही. बरे, प्रायश्चित्त मागितलेच व द्यायचेच तर ते शुद्ध करून घेणारे का दिले नाही या घटनेचा धर्मशास्त्राचे वक्तव्य लक्षात घेतले तर उलगडा होत नाही.[४] अर्थात आळंदीच्या ब्रह्मवृंदाने विठ्ठलपंतास जे देहान्त प्रायश्चित्त सांगितले ते सर्वस्वी शास्त्रविरुद्ध होते यात शंका नाही.

'दण्डवत् प्रायश्चित्तानि भवन्ति' असे असल्याने व पातक उपपातक, महापातक सर्वांना योग्य अशी अनेकविध प्रायश्चित्ते धर्मशास्त्राने विवेचलेली आहेत. आरोपीच्या गुन्ह्याचे स्वरूप लक्षात घेऊन त्याला उचित असे शास्त्रविहित शासन शोधून देण्याचे कार्य धर्मशास्त्राचा व्यासंग असणाऱ्या संस्कृतज्ञ शास्त्रीपंडितांनाच करणे शक्य होते. त्यामुळे त्याकाळी राजाने न्यायदानासाठी सभासद निवडलेले असत ते न्याय देण्याचे कार्य करीत. राजा या सभासदाचा अध्यक्ष असे. शिक्षेमध्ये त्याला फारसा बदल करता येत नसे. क्वचित तो ती सौम्य करी पण आरोप सिद्ध झाल्यावर आरोपीला सर्वस्वी मुक्त करणे त्याला तत्त्वतः कठीण होते. विठ्ठलपंत वर्षानुवर्षे बहिष्कृत आयुष्य जगले होते. समाजाने त्यांच्यावर अन्याय केला तो त्यांनी मुकाटपणे सोसला पण मुलांवर अन्याय होत आहे तो दूर करावा म्हणून न्याय मिळविण्यासाठी ते ब्रह्मवृंदाला शरण गेले पण ब्रह्मवृंदाने धर्मशास्त्र धुडकावून लावले. येथे रूढी शास्त्राच्या विरुद्ध आहे म्हणून तसे करता येत नाही असाही प्रश्न नव्हता कारण अशा तऱ्हेची रूढी समाजात असण्याचे कारणच नव्हते. ही घटना अगदी विरळ किंवहुना एकमेव होती. म्हणून आळंदीच्या विद्वान ब्राह्मणांनी नुसता शास्त्रार्थ मनात आणला असता तर त्यांना विठ्ठलपंतांच्या कोलमडणाऱ्या संसाराला सावरता आले असते; व ज्ञानेश्वरादि भावंडे पोरकी करण्याची दुर्घटना टाळता आली असती. ब्रह्मवृंदांचा निर्णय ऐकल्यानंतर विठ्ठलपंत कोणतीही हालचाल करू शकले नाहीत. न्याय मिळविण्यासाठी शासनसंस्थेपर्यंत जाण्याची त्यांना जरूर वाटली नाही. अशा तऱ्हेने दयेची याचना करण्यासाठी ते थांबलेच नाहीत. त्यांचे सबंध आयुष्य हे प्रक्षुब्ध, संत्रस्त व उद्विग्न असले पाहिजे. त्यांना गृहस्थाश्रमाचा स्वीकार करायला लावणारे रामानंदांसारखे खंबीर सद्गुरु पुढील बहिष्कृत आयुष्यात त्यांना भेटले नाहीत हे दुर्दैव! अथवा आळंदी सोडून आपली मुलं पोरकी करण्यापूर्वी शास्त्रार्थ पाहण्यासाठी ते फिरून काशीलाही गेले नाहीत. हे सारे करायला लावणारा, धर्माच्या वादळात एकट्याने अविचल उभे रहायला लावणारा, मनाचा खंबीरपणा ते पुढे टिकवून धरू शकले नाहीत किंवा अशारीतीने जीवनाविषयी धैर्य व उत्साह उत्पन्न करणारा, अन्यायाला टक्कर देत समर्थपणे उभे रहायला लावणारा मनाचा निश्चय पुढे त्यांचा झाला नाही, किंवा माझ्या मृत्यूने मुलांवरचा कलंक नाहीसा होत असेल तर मला गेलेच पाहिजे अशा अतीव त्यागाच्या उदात्त भावनेने त्यांनी आत्मघात केला असला पाहिजे.

---

३. पराशरस्मृतीपासून अत्रि, अंगिरा, आपस्तंब, दक्ष, हारित, बृहस्पति, शंख इत्यादि ज्या स्मृति झाल्या त्या सर्वांत प्रायश्चित्तांचा फार मोठा विचार केला आहे. पण तेथेही अशा तऱ्हेचा आधार सापडत नाही.

४. श्री ज्ञानेश्वरदर्शन भाग- १ पृ. २७ ते ३४








श्री. रा. ना. चव्हाण

# लोकहितवादींची लोकदृष्टी व लोकसेवा

आद्य समाजसुधारकांत लोकहितवादी पहिले ठरतात., कारण समाजसुधारणुकीविषयी प्रथमच त्यांनी फार लिहीले आहे, व त्यांच्या हयातीतच ते पुष्कळपणे वाचनात आले. विचारपरिवर्तनातून सामाजिक परिवर्तन घडत असते. असा पायंडा लोकहितवादीनी मोठ्या प्रमाणात सुरू केला. '**प्रभाकर**' साप्ताहिकातील पत्रे, त्यानी वरिष्ठ वर्गीयांना उद्देशून लिहिली होती, तरी त्यांच्यामुळे, एकूण समाज जागा झाला. लोकहितवादीनी फार मोठा पहिला हादरा दिला व आगरकरांच्या 'समाजसुधारका'साठी जमीन नांगरून ठेविली. समाज सुधारकाच्याद्वारे आगरकरांना जास्ती पुढे विचारक्रांती घडवून आणिता आली. पुण्याच्या सार्वजनिक जीवनातील लोकहितवादी हे एक पहिले पुढारी होते. पुण्यास प्रथम लायब्ररी उघडण्यात, लोकहितवादींचा मोठा भाग होता. दादोवा पांडुरंग व त्यांचे शिष्य भवाळकर यांचा शिक्षणखात्यातील नोकरीनिमित्त पुण्याला लाभ झाला. हा काळ सन १८५७ च्या पूर्वीचा होता. समाजसुधारणेच्या इतिहासात 'परमहंस–सभा' हे पहिले पाऊल ठरते. या सभेच्याद्वारे एकेश्वरी सामाजिक विचार पुण्याच्याही समाजसुधारकांना प्राप्त झाले. जोतीरावांना देखील परमहंस सभेतील सभासद व त्यांचे नव विचार यांचा क्रमप्राप्त लाभ झाला. जोतीरावांनी त्यांचा छत्रपती शिवाजी यांचा पोवाडा परमहंस सभेचे पहिले व शेवटचे अध्यक्ष राम बाळकृष्ण यांना सादर अर्पण केलेला आढळतो. लोकहितवादी व जोतीराव या दोघांच्या विचारात एकेश्वरवादाचा पुरस्कार आहे. पेशवाईत सुरू झालेली दक्षिणा वाटण्याची पद्धत, बदलून ती लोकशिक्षणाकडे वळवावी, याबद्दलचा अर्ज, सरकारास धाडण्याच्या कामी लोकहितवादी एक प्रमुख होते; व या कार्यात जो पुणे येथे संघर्ष झाला, प्रतिकार झाला, त्यावेळी जोतीरावांनी पुढे होऊन लोकहितवादी आदीकरून मंडळींची चांगलीच बाजू राखली. परलोकवासी केशवराव भवाळकर यांच्या आत्मचरित्रातून वरील सुधारकांच्या परस्पर मैत्रीचा सुगावा उपलब्ध होतो. [ भवाळकरांचे आत्मवृत्त पान १०६ व १०७] हा सुगावा सामाजिक सुधारणेचे धागेदोरे व पूर्व परस्पर संबंध जाणण्यास व तौलनिक अभ्यासास फारच उपयुक्त ठरणारा आहे. पुण्यास सन १८४८ सालानंतर निघालेली पहिली मुलींची शाळा व पहिली अस्पृश्यांची शाळा चालू करण्यात वरील सर्व पहिल्या पुरोगामी मंडळींचा लहान मोठा भाग होता. जोतीराव फुले हे सुधारकांचे नेते किंवा सुधारकानाही कृतीने सुधारू शकणारे त्यांचे पुढारी होते. लोकहितवादींचा महार-मांगांच्या मुलांच्या शाळेला आर्थिक वर्गणी देण्याचा 'एक रुपाया' हा आकडा फार लहान आढळतो ('त्रिमूर्ती दर्शन' पान ७३ मासिक वर्गणीदारांची यादी ) तरी त्यांची वैचारिक वर्गणी फार मोठी होती; प्रथमतः शतपत्रांच्याद्वारे त्यानी लोकशिक्षणासाठी पुष्कळ वैचारिक धन उपलब्ध केले. जोतीराव हे देखील एक लोकहितवादी होते म्हणजे लोकहितवादींच्या बऱ्याच विचारांचा त्यांच्यात अंतर्भाव आढळतो. म. फुले कृत 'कसब व 'गुलामगिरी' एवढी दोन पुस्तके व गोपाळराव देशमुख यांची शतपत्रे वाचली तरी, या म्हणण्याची साक्ष कोणासही पटेल.

### ब्राह्मणेतर चळवळींचे जनक ?

लोकहितवादी सूक्ष्म व तौलनिक विचार केल्यावर महाराष्ट्रातील ब्राह्मणेतर चळवळीचे एक जनक ठरतात. निदान त्यांना वैचारिक जनक मानणे कालप्राप्त ठरते. कारण शतपत्रे "गुलामगिरी" (सन १८७३) ह्या म. फुल्यांच्या पुस्तकाच्या अगोदर प्रसिद्ध झाली. शतपत्रात सांगितलेली सामाजिक परिस्थिती प्रत्यक्षतः बदलण्यासाठी, जोतीरावांनी 'सत्यशोधक समाज' पुढे होऊन स्थापन केला. शतपत्रांनी जमीन नांगरली होती. भिक्षुकशाहीविरुद्ध विचार व्यक्त करण्याचा नवा



अनुक्रमणिका






उपक्रम प्रथम केला होता. लोकहितवादींनी विदारकपणे भिक्षुकशाहीची चिरफाड केलीच होती. या प्रकारच्या विपुल लेखनात स्पष्टोक्तीच्या बाबतीत, लोकहितवादींनी पुष्कळ ठिकाणी म. फुल्यांच्यापेक्षाही जास्ती मात केलेली आढळते. लोकहितवादींची लेखणी कमी धारेची नव्हती. या धारेला ओघही आढळतो. ब्राह्मणेतरांची मुले शिकली सवरली पाहिजेत. असे लोकहितवादींनाही उत्कटपणे वाटत होते. रानडयांना देखील वाटत होते. लोकहितवादींना लोकदृष्टी होती. लोकाभिमुखता होती. कोणी कोणी काही प्रसंग पुढे करून त्यांच्या कर्तेपणाचा कचखाऊपणा दाखवितात; व त्यांना गौणत्व आणण्याचा प्रयत्न करतात; पण कर्ते पुढारी व सुधारकाग्रणी महात्मा फुले हे लोकहितवादींना विसरले नाहीत. शूद्रांच्या शाळांच्या रिपोर्टात लोकहितवादींचा जमाखर्चात उल्लेख आहेच; पण म. फुले यांनी काव्याच्याद्वारे लोकहितवादींना जरूर ती पावती दिली आहे. "आर्याजींची नीति अति अमंगळ ॥ कथीली गोपाल देशमूखे ॥' ( महात्मा फुले समग्र वाङमय पान ४९६ ) म. फुले वरिष्ठ म्हणविणारांस 'आर्य' हा शब्द योजित असत.

म. फुले यांच्या परंपरेत, 'दीन बंधू' साप्ताहिकाचे पहिले संपादक परलोकवासी कृष्णराव पांडुरंग भालेकर व दुसरे प. वा. नारायणराव मेघाजी लोखंडे, असे दोन महत्त्वाचे विचारवंत कार्यकर्ते होऊन गेले. 'दीन-बंधू' ह्या नावाप्रमाणे गरीब शेतकरी-कष्ट करी व गिरणीकामगार यांचा आवाज उठवित असे. या दोघानीही 'शतपत्रे' वाचली होती. 'शास्त्राधार' नामक छोटया पुस्तकात कै. भालेकर यांनी प्रस्तावनेत गोपाळ हरी देशमूख यांचा निःपक्षपाती विचारवंत, म्हणून उल्लेख केला आहे. नारायणराव लोखंडे यांनी शतपत्रातून स्फूर्ती घेतली, अशी त्यांच्या अल्पपणे उपलब्ध असलेल्या चरित्रात माहिती आढळते. लोकहितवादी इहलोक सोडून गेले त्यावेळी विद्येत मागासलेल्या समाजांच्या सभांनी व सार्वजनिक संस्थांनी, त्यांचे गुणग्रहणपूर्वक स्मरण करून दुःखप्रदर्शन केले. लोकहितवादींचा त्यांच्या हयातीतच या सर्व पुढाऱ्यांशी चांगला परिचय होता; व हे शेतकऱ्यांचे पुढारी लोकहितवादींना चांगले जाणत होते. नंतरच्या पुढाऱ्यांवरही शतपत्रांचा परिणाम झाला.

हल्ली श्री. प्रियोळकर संपादित लोकहितवादींच्या लेखांचा संग्रह उपलब्ध झाला आहे. पण पुष्कळवर्षापूर्वी "शतपत्रे" वारंवार पुनर्मुद्रित केली जात असत. 'सुबोधपत्रिका' (मुंबई), 'प्रबोधन' (पुणे) अशा कितीतरी जुन्या अनेक साप्ताहिकांच्या फाईलीतून 'शतपत्रे' पुनः पुनः दिलेली आढळतात. लोकहितवादींची मराठीभाषा बालबोध व सरळ असल्यामुळे, पहिल्या पिढीतील अर्ध व नव्या शिक्षितांना -साक्षरांना ती वाचणे सोपे झाले, सांगण्याचे तात्पर्य हे की, लोकहितवादींचे लेखन समाजाच्या खालच्या थरापर्यंत जाऊन पोहोचले होते; व हे आत्मपरीक्षणपूर्वक झालेले नव-लेखन, पुष्कळांना स्फूर्ती देऊ शकले; व पुष्कळांनी त्यांचे वारंवार मनन केले. ज्यानी ह्या लेखनाची उपेक्षा केली, त्यांना समाजात नवप्रेरणा करिता आली नाही; व अशी मंडळी फारशी लोकाभिमुख ठरली नाहीत. लोकहितवादींचे गुण, व त्यांची योग्यता अजूनही लक्षात यावयाची आहे; त्यानी प्रेरणा निर्माण केली.

ब्राह्मणेतर चळवळ ही लोकचळवळ होती; व तिच्यांत कृति व विकृति होती, गुणदोष भरपूर होते. पहिली लोकांची व खेडयापाडयांची जागृति म्हणून तरी ती उल्लेखनीय आहे. विद्याप्रसार हा तिचा हेतू तडीस गेला आहे. तिचा कार्यभाग आज पुष्कळअंशी संपला. या चळवळीला पहिले खतपाणी लोकहितवादींच्या लेखनातून मिळाले, ही फारशी ज्ञात नसलेली बाब प्रामुख्याने येथे सांगावयाची आहे. महात्मा जोतीराव यानी ब्राह्मणेतर सत्यशोधक चळवळीला जन्म देण्यासाठी प्रामुख्याने, 'गुलामगिरी' वगैरे अनेक पुस्तके लिहून प्रसिद्ध केली. ह्या प्रकारचा प्रत्यक्ष हेतू, खुद्द लोकहितवादींचा होता, असे येथे म्हणावयाचे नाही. पण अप्रत्यक्षतः शतपत्रे व त्यातील उद्गार हे आधाराला व प्रमाणे देण्यास उपयोगात आले व येतात. लोकहितवादी व फुले यांच्या विचारांतील साम्यस्थळे, व समानविचार यांचा संग्रह करणे बरेच शक्य आहे. खुद्द लोकहितवादी त्यांच्या जीवनक्रमात नानाविध



अनुक्रमणिका






लोकांत मिसळले. विविध चळवळींशी त्यांचा संबंध आला. निबंधमालाकाराप्रमाणे ते सत्यशोधक समाज व जोतीबा फुले यांचे विरोधक नव्हते. प्रार्थनासमाज व आर्यसमाज यांच्याशी तर त्यांचा संस्थापकीय हिस्सा होता.

## देशभक्ती व लोकहितवादी

लोकहितवादीनी निर्माण केलेल्या संस्थांपैकी आज अनेक संस्था यद्यपी ठिकठिकाणी प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष आहेत. वाईस जज्ज म्हणून काम करीत असताना लोकहितवादीनी सार्वजनिक पहिले नेटिव्ह वाचनालय चालू केले; व ते पुढे रूपांतरीत होऊन, आजही चालू आहे. पण ही माहिती फारच थोडया स्थानिक लोकांना ज्ञात असेल, नसेल ! उदाहरणादाखल ही एक त्यांची पूर्व कामगिरी येथे सांगितली आहे. समग्र लोकहितवादींचे दर्शन अजूनही अपूर्ण आहे. लोकसेवा व लोकजागृति यासाठी त्यानी विचार मांडिले. तेच लोकापुढे आले.

सुधारक हे परप्रत्यीन व अनुकरणवादी आहेत; असा कोता आरोप सुधारणा रोखण्यासाठी पुढे करण्यात आला; पण आरोप करणारांना देखील पाश्चात्य ज्ञान–विज्ञान सर्वथैव दूर ठेविता आले नाही व येत नाही. गोपाळ हरी, रानडे– मोडक – भांडारकर वगैरे सुधारकांना, त्या काळांत उदरभरणार्थ व स्वप्रपंचासाठी नोकरीत शिरावे लागले. पण नोकरीनिमित्त ही थोर मंडळी, ज्या ज्या ठिकाणी गेली त्या त्या ठिकाणी, त्यानी लोकसेवापर व समाजजागृतीपर विविध संस्था निर्माण केल्या. " देशातील सर्व लोकांवर सारखे प्रेम करणे म्हणजे देशभक्ती, " अशी एक देशभक्तीची विधायक व्याख्या मोडकांनी मांडिली आहे. लोकहितवादीना नोकरीनिमित्त पुणे – वाई – नाशिक येथे जावे लागले एवढेच नव्हे तर पुढे अहमदाबाद–सुरत येथेही ते वरिष्ठ अधिकारी म्हणून गले; व गुजराथी समाजात राहूनही पुण्याप्रमाणे त्यानी त्यांचे विशाल सार्वजनिक जीवन टिकविले. विविध पुरोगामी व समाजसुधारक संस्था निर्माण केल्या व त्यांना साह्य केले. लोकहितवादींचे काही विचार प्रि. आगरकर यांच्यातही आढळतात. सुधारकांचा सुटा व वेगवेगळा विचार करण्यापेक्षा तौलनिक व समन्वयक विचार केल्यास अधिकाधिक निकोप दृष्टी प्राप्त होऊ शकते; व सामाजिक सुधारणेच्या इतिहासाचे धागेदोरे व परस्परसंबंध कळू शकतात. उदाहरणार्थ– दादोबा पांडुरंग यांच्या " धर्मविवेचन " नामक पुस्तकात जे नवधर्मपर विचार आढळतात, त्यासारखेच विचार म. फुल्यांच्या ' सार्वजनिक सत्यधर्म ' पुस्तकातही दिसून येतात. महाराष्ट्रात सुधारक सर्व थरात झाले. म्हणून महाराष्ट्र पुष्कळ अंशी एकजिनशी झाला व होत आहे. या सामाजिक विकासाची पायाभरणी लोकहितवादी–फुले यांनी केली. समाजसुधारक देशभक्तच नव्हते व नाहीत. असा अपसमज व गैरसमज त्यांच्या काळात होता व आजही आढळतो; पण हा भ्रममूलक आहे. तितकासा संपूर्ण खरा नाही. रानडे–गोखले–आगरकर देशभक्त होते. देशसेवक होते. फक्त क्रांतिकारक व तुरुंगात जाणारे तेवढेच देशभक्त, ही व्याख्या अपुरी आहे, लोकहितवादी–फुले यांनीही देशातील लोकांची व देशभाषेची सेवा केली. कळकळ, दीर्घोद्योग, चिकाटी, आमरण प्रयत्न, विद्येची उपासना इत्यादि अनेक गुण आपल्याला लोकहितवादींच्यापासून शिकता येतात. महाराष्ट्राला छिद्रान्वेषीपणा हा एक शाप आहे; एकाला मोठे म्हणण्यासाठी, दुसऱ्या मोठ्याला लहान ठरविण्याचे वास्तविक कारण नसते; मोडक-रानडे-गोखले लोकहितवादी-भांडारकर ही मंडळी नेमस्त विचाराची होती म्हणून देशभक्त नव्हती, हा एकांगी विचार झाला. देशाच्या इतिहासात ह्या सर्वांनी केवढी तरी आचार -विचारांची भर घातली आहे. लोकहितवादी व फुले यांना इंग्रज कायमचा येथे राहाणार नाही, असे द्रष्टेपणाने ठाऊक होते; व दोघानीही तसे लिहिले आहे. लोकहितवादी गोपाळराव देशमूख यांची लोकहितवादी या टोपण नावाने लिहिलेली छोटी पत्रे ( लहान लेख ) ' ज्ञानोदय ' पत्रातही आढळतात. त्यांच्या विपुल लेखनातील " शतपत्रे " हा विभाग जास्तीपणे वाचला गेला व चर्चिला गेला.

लोकहितवादींचा जनतासंपर्क कमी नव्हता. नोकरी (व तीही परकीय सरकाराची) लोकसेवेच्या











कार्यांत म्हणजे देशभक्तीच्या मार्गांत आडवी येत नाही; हे लोकहितवादी-मोडक-रानडे-भांडारकर प्रभृतींनी जबाबदारी सांभाळून सिद्ध केले. निर्दोष कोणीच नसते. पण लोकहितवादींच्या पासून आजही पुष्कळ शिकता येण्यासारखे आहे. त्यानी इतिहासाची पुष्कळ साधने एकत्रित करून संपादित केली; व ह्या कामात कसलाच पक्षपात केला नाही. सर्वसामान्यांना स्वजातीचा पक्षपात सुटत नाही; थोरामोठ्यात हा दोष आढळतो. पण पारिवारीकता ओलांडून स्वसमाजाचे दोष स्पष्टपणे लिहिणारा, लोकहितवादीसारखा द्रष्टा पुरुष दुर्मिळपणे सांपडतो. व होऊ शकतो. आजही स्वपक्षाचे दोष समजून घेण्याच्या कामी कुचराई होते. 'आत्मपरीक्षण' हा मोठा गुण लोकहितवादी व रानडे वगैरे थोर समाजसुधारकात आढळतो. न्यूनगंडात्मक विचार व आत्मपरीक्षण या दोघांची गल्लत करून सुधारक न्यूनगंडाने पछाडले होते, असे म्हणण्याची नवी प्रथा पाडण्यात आली ! पण ही देखील सुधारणावाद रोखण्यासाठी निर्माण झाली. स्वदोष झांकणे म्हणजे देशभक्ती, राष्ट्रीयता किंवा देशसेवा नव्हे. स्वदोषांचे व सामाजिक रोगांचे निरसन व्हावे, म्हणून स्वदोषांची जाणीव लोकांना होणे क्रमप्राप्त आहे; व ही जाणीव प्रथम लोकहितवादींनी करून दिली. स्वसंस्कृति व स्वधर्म यांचा अहंकार त्यांना नव्हता; पण स्वाभिमान खास होता. सर्व समाजसुधारकांवर एकसारखे ठराविक आरोप करण्यात आले. यातून राममोहन राय यांच्या सारखे, आधुनिक भारताचे जनकदेखील सुटले नाहीत. स्वकीयांचा विरोध सहन करून व एकाकी राहून यासर्वांनी देशसेवा केली; देशभक्ती केली. लोकजागृती केली. 'लोकहितवादी' हे टोपण नांव प्रथमपासून घेण्यात, 'गोपाळ हरी' याचा दृष्टिकोण समजतो; लोकपरायणता कळते. लोकाभिमुख दृष्टीचे प्रत्यंतर येते. लोकहितवादी लोकप्रिय नव्हते, तरी देशभक्त होते. लोकसुधारणा करण्याचा प्रयत्न करणे व त्याप्रकाराने विचारक्रांती घडवून आणणे ही फार मोठी अंतर्मुख देशभक्ती ठरते; व ही सर्व समाज व धर्मसुधारकांत होती.

## देशसेवक दृष्टी व धर्मसुधारणा

लोकहितवादींनी त्यांचा नवा लोकहितवाद त्यांच्या वाङमयतपस्येतून व्यक्त केला. अपार कष्ट करून त्यानी त्यांची काया व नेत्र झिजविले. विचारपरिवर्तनीय भाषासेवा व ग्रंथनिष्पत्ती हा मार्गदेखील देशभक्तीचा होऊ शकतो, गुणाधिक्याने लोकहितवादी आदीकरून समाजसुधारकांची योग्यता ठरू शकते. लोकहितवादी व फुले दोघेही अज्ञेयवादी नव्हते; नवयुगधर्माचे दोघेही पुरस्कर्ते झाले. तौलनिकदृष्टचा लोकहितवादींचे लेखन जास्ती जळजळीत ठरेल. परोपजिवीपणा व परान्नपुष्टता या दोन दोषांवर लोकहितवादींनी कठोर लेखणी चालविली. कष्टाने– श्रमाने जगणे व संसार ऐदीपणा सोडून काही उत्पादन व नोकरी करून का होईना स्वकष्टाने करणे हा एक देशभक्तीचा सामान्य मार्ग ठरतो. या नवदृष्टीने लोकहितवादींनी धर्मसुधारणांचा मार्ग पत्करिला. लोकहितवादींना समाजसुधारक म्हणून प्रमुखतः ओळखले जाते. धर्म सुधारल्याशिवाय समाजसुधारणा अशक्य ठरते. म्हणून धर्मसुधारणेच्या दृष्टीने लोकहितवादींनी आर्यसमाजाचा पुरस्कार केला होता. त्यांच्याच वर्गात मोडणारे दुसरे सुधारक म. फुले हेदेखील मूलतः लोकहितवादींच्या प्रमाणे धर्मसुधारक होते. व धर्मसुधारणेसाठी त्यानी सत्यशोधक समाज प्रस्थापिला. या दोन सुधारकांचा असा समन्वयक विचार करावा लागतो. म्हणजे जरूर त्या विशाल दृष्टीचा लाभ अभ्यासकांना होऊ शकतो. दोघांनीही निबंधमालेच्या द्वारे झालेली वैयक्तिक हेटाळणी, दुर्लक्षून स्वतःचा मार्ग चोखाळिला. आगरकराच्याहीपेक्षा लोकहितवादींच्या लेखणीचा परिणाम म. फुल्यांच्या पासून ते सर्व बहुजनसमाजातील विचारवंतांवर जास्तीतज्यास्तपणे झाला; व लोकहितवादी हे त्यांचे स्फूर्तिस्थान ठरले; व अनेक लोकसेवकाना त्यानी प्रेरणा दिली. त्यांच्यातील काही विसंगती महत्त्वाची नाही. परिणामाच्या दृष्टीने ते किती लांबवर प्रभावी ठरले, हा प्रभाव जास्ती महत्त्वाचा आहे.








डॉ. उषा वि. करंवेळकर

# यम-यमी संवाद (ऋ. १०–१०)

[ ऋग्वेद १०–१० मध्ये यम-यमी या बन्धुभगिनींचा संवाद आलेला आहे. यमासंबंधीचे सर्व वैदिक संदर्भ एकत्रित करून, तसेच यमासंबंधाने आजपर्यंत मांडल्या गेलेल्या अनेकविध मतांचा विचार करून यमासंबधाने स्वतःचे विचार यात मांडण्याचा प्रयत्न केलेला आहे. काही मान्यवर संशोधकांची मते खोडून काढावी लागली आहेत. हिलेब्रॉण्टने सुचविलेली यम = चन्द्र ही कल्पना उचलून धरून आवश्यक तो अधिक पुरावा उपनिषदातून दिलेला आहे. ऋग्वेदातील सर्व देवता ह्या निसर्गातील निरनिराळ्या शक्तींची प्रतीके आहेत. यम म्हणजे चन्द्र होय. कारण यज्ञ आणि छन्द यांचे त्याच्यात वास्तव्य आहे. ]

## प्रास्ताविक :–

ऋग्वेद मण्डल १० सूक्त १० हा यम-यमी म्हणजे ऋग्वेदातील अतिशय मनोरंजक असे एक सूक्त आहे. संवाद नाटयपूर्ण असून त्याचा विषयही अगदी वेगळाच आहे. त्यामुळेच त्यासंबंधाने बराच ऊहापोह झालेला आहे. मानवोत्पत्तिसंबंधी फार प्राचीन कथा त्यामागे असल्याचेही सांगितले जाते. त्या कथेशी जुळणाऱ्या अनेक प्राचीन संस्कृतीतील व रानटी टोळ्यांच्यामधील कथा दिल्या जातात. ते सूक्त सुसंघटित नसल्यामुळे समजण्यास व स्पष्ट करण्यास तितकेसे सोपे नाही. संवादातील दोन पात्रांपैकी यमी अतिसंदिग्ध तर यम फार गूढ स्वरूपाचा आहे. त्यामुळे ह्या संवादासंबंधाने विचार करणे योग्य वाटते.

## वेदात यम

प्रथम वेदाने यमाबद्दल काय म्हटले आहे ते पाहू. १ ल्या व १० व्या मण्डळात मिळून पन्नास वेळा 'यम' हा शब्द उच्चारला गेला आहे. ऋग्वेदात यमाला उद्देशून तीन स्वतंत्र सूक्ते आलेली आहेत.

### १. यम हा देव ठरतो

ऋ. च्या १० व्या मण्डलात यमाचा वरुण, बृहस्पती, अग्नि इत्यादींच्याबरोबर निर्देश आला आहे. तसेच "त्या एकाशी" एकरूप असलेल्या अग्नि, मातरिश्वन् यांच्याबरोबरही निर्देश आहे. (१.१६४.४६) अग्नि यमाचा मित्र आहे. दडून बसलेल्या अग्नीला त्यानेच शोधून काढले. (१०.५१.३) तो देवांच्यामध्ये असतो आणि स्वतः-देखील देव आहे (१०.६४.३,९२.११) तो अमर्त्य आहे. त्याला सोम दिला जातो. यज्ञात त्याला आसन दिले जाते. आपल्या भक्तांना तो दीर्घायु देतो. (१०.१४.१३-१४). यम देव आहे. (बृहदारण्य. १.४.११,३.९.२१)

### २. यमाचे पितरासह वास्तव्य असते–

मृत पितरांचा व विशेषतः अंगिरसाचा व यमाचा निकट संबंध आहे. (१०.१४). यांच्यासह तो यज्ञस्थली जातो. पण तो त्यांच्याहून वेगळा आहे. (१०.५०.८) एकदा त्यालाही 'पिता' म्हटले आहे. (१०.१३५.१) पण 'मृत पिता' वा 'मानवांचा पिता' नव्हे.

### ३. यम राजा आहे–

तो मृतांचा राजा आहे. (९.११३.८,१०.१४.३ इत्यादि) तो लोकांचा स्वामी आहे, लोकांना एकत्रित आणणारा आहे. (१०.१४.१) मृताला तो विश्रान्ती देतो. (१०.१४.३) तसेच अथर्ववेदात १८. २. ३७ तो त्यांना स्थान देतो स्वर्गमार्गाने जाताना मृत व्यक्ति त्याला वरुणाबरोबर पाहते. (१०. १४. ७) मृताचे अन्तिम असे गन्तव्य स्थान प्रथम जाणणारा यम होय (१०.१४.२)

### ४. यम मर्त्य आहे–

यमाचा देव म्हणून स्पष्ट निर्देश नसला तरी त्याचा मानव म्हणूनही निर्देश नाही. तो मर्त्य








आहे. मर्त्यात त्याने प्रथम मृत्यूला स्वीकारले (१०.१०३ अथर्व. १८.३.१३)

## ५. यमाचे निवासस्थान

यमाचे निवासस्थान आकाशात अतिदूर आहे. (१०.६४.३ इ.) ते नदीपलिकडील उंच पर्वतावर आहे. तीन स्वर्गापैकी दोन सवित्याचे तर एक यमाचे आहे. (१.३५.६) आणि तो हा तिसरा व सर्वात उच्च. त्याचे निवासस्थान हे देवांचेदेखील वास्तव्याचे ठिकाण आहे–'देवमान' (१०.१३५.१). तेथे त्याचा प्रासाद 'इर्म्य' आहे. (अथर्व १८.४.५५) त्यालाच 'यमस्य सदनम्' असे देखील म्हटले आहे. (१०.१३५.७) तेथे एका सुंदर वृक्षाखाली यम देवासह आनंदाने असतो. त्याठिकाणी थंडीचा कडाका जाणवत नाही वा कुठल्याच दुःखाची आच पोहोचत नाही. ते सतत संगीताचे स्वरांनी दुमदुमले आहे. यम यमीसह या उच्च स्वर्गात राहतो. (वाज. संहिता १२.६३) यमी ही यमाची पत्नी होय. (मैत्रा. १.५.१२)

## ६. यम आणि मृत्यु

मृत्यूला यमाचा मार्ग म्हटले आहे. (१.३८.५) यम हा मृत्यूचा बन्धू होय. (वाज. ३९.३३) मृत्यू त्याचा दूत होय. (अथर्व १८.२.२) यम म्हणजेच मृत्यू (१.६५.४, मैत्रा. ३.५.६; अथर्व ६.२८.३१)

## ७. यम व त्याचे कुटुंब

विवस्वत् हा यमाचा पिता व सरण्यु ही माता (१०.१४.१–५; १७.१–२; ५८) गंधर्व व अप्सरा (जलदेवता) यांची यम–यमी ही अपत्ये. (१०.१०) यावरून विवस्वत् हा गंधर्व आणि सरण्यु ही आप्या योषा असावी असे वाटते; ज्यांनी ह्या जुळ्याला जन्म दिला. यमाच्या कुत्र्यांचा उल्लेख मिळतो. (१०.१४.१०,१२) घुबड आणि कपोत हे दूत होत. (१०.१६५.४) त्याचे सुवर्णनेत्रांचे अश्व आहेत. (तैत्तिरीय आरण्यक ६.५.२) त्या अश्वानां लोखंडाचे पाय आहेत. त्याचे षड्विश हे वरुणाच्या पाशाप्रमाणे आहेत.

## ८. यम आणि यज्ञ

यमाने प्रथम यज्ञतंतू पसरला. (७.३३.९-१०) लपलेल्या अग्नीला यमाने शोधून काढले. तोच पहिला यज्ञकर्ता असून पहिले हविर्द्रव्यही तोच आहे. (१०.१३.४) "मृत्युविरहित जन्म असूनही यमाने प्रजेसाठी मृत्यू स्वीकारला." १.८३.५ त्याने आपले शरीर यज्ञाचे स्वाधीन केले. सगळे छन्द यमात शिरतात, (१०.१४.१६, अथर्व- १८.२.६,३२)

## ९. यम आणि सूर्य

यमाचा सूर्याशी संबंध आहे. (१.१६३.२) तो सूर्याचा (विवस्वान्) पुत्र होय. तो सूर्याप्रमाणे दोन अश्वादींनी युक्त आहे. दोहोंत विरोधही दिसतो. (१०.१४.२; वाजसंहिता– २४.१ शत. ब्रा. १३.२.२.७) ऋग्वेदातील यम आणि यमी यांचा १०.१० सूक्तांतील संवाद वगळून वरील माहिती यमासंबंधाने वेदातून मिळते.

## ऋग्वेद १०.१०

ह्या प्रसिद्ध यम-यमी संवादाबद्दल अनेकदा चर्चा होऊनही त्याचे योग्य स्पष्टीकरण झालेले नाही. अथर्ववेदातही हा संवाद थोड्याफार फरकाने आढळतो. (१८.१-६) अतिशय प्राचीन आणि शृंगारपरिपूर्ण असा हा संवाद आहे. यासंबंधाने विद्वानांनी पुढील उद्गार काढलेले आहेत–

**Macdonell**– "It was doubtless the survival of an already existing myth of the descent of mankind from the primeval twins."

**Schroeder**– "A fertility drama from which the prudishness of the Vedic age has omitted the vital part of the union of the pair."

जुळ्या बन्धुभगिनीच्या जोडीद्वारा मानवजातीची उत्पत्ति झाल्याच्या प्राचीन कथेवरच हा संवाद आधारित असल्याचे **Winternitz** ला देखील वाटते.

**Rev. H. Heras**– "It is spoiled by the sophisticated Vedic Risis with their scrupulously misunderstood code of ethics."










अनुक्रमणिका

**Keith**– "The great law of Varuṇa and Mitra invoked in the course of the dialogue could not but admit an exception in the beginning of the history of man."

या सर्व विद्वानांच्या मते मानवोत्पत्ती ही जुळचा बन्धुभगिनीपासून झाल्याचे सांगणारी एक कथा या संवादाच्या मुळाशी आहे. पण सूक्तकर्ता वैदिक ऋषि स्वतःच्या चुकीच्या नीतिविषयक कल्पनांच्यामुळे तसेच तो दिखाऊपणाच्या नादी लागून बन्धुभगिनीचा संभोग दाखवू शकला नाही. व त्यामुळे जुळचा भावंडापासून मानवजात उत्पन्न झाल्याचे त्याला दाखविता आले नाही.

ह्याच कल्पनांचा आपल्या "progressive Yama mythology" ला आधार देऊन डॉ. दांडेकर देखील वैदिक कवीला दोष देतात.

## यमाच्या स्वरूपासंबंधीची मते

यमासंबंधीचे सर्व वैदिक निर्देश समोर असून देखील विद्वानात यमासंबंधाने एकमत नाही. हा अर्थातच वैयक्तिक पूर्वग्रहाचाच परिणाम होय.

सर्व पाश्चात्य पण्डितांनी ह्या संवादाच्या मुळाशी मानवजातीच्या उत्पत्तीची प्राचीन कथा असल्याचा ग्रह करून घेतलेला आहे. विशेष असा की भारतीय विद्वान् देखील त्याला दुजोरा देताना दिसतात. वैदिक यम आणि यमी यांच्यातील संभाषणाशी जुळणाऱ्या कथा इतर संस्कृतीत दिसतात. विशेषतः अवेस्त्यांतील कथा. त्यामुळे संशोधकांना आपल्या मताला पुष्टि मिळाल्याचे वाटून ते १०.१० च्या मुळाशी मानवोत्पत्तिसंबंधीची कथा असल्याचे आग्रहाने प्रतिपादन करतात.

रॉथ, ओल्डेनबर्ग, हाप्किन्स, विंटरनिट्झ, मॅक्डोनेल, कीथ् आदि पाश्चात्य पण्डितांनी याच आधारावर आपापली मते मांडली. म्हणून यम–यमी –संयोग न दाखविणारा वैदिक कवी तत्कालीन नैतिक कल्पनांच्या विरुद्ध जाऊ न शकल्याने त्याने कथाच बदलली असे त्या संशोधकांना वाटणे साहजिक आहे. हे सर्व विद्वान् ॲडम आणि ईव्हची कल्पना मनात बाळगून यमाकडे – पहिला मानव – मर्त्य असलेला या दृष्टीने बघतात. तसेच यमीला पहिली स्त्री समजतात.

सर्व संशोधकांना हे मत पटत नाही. काही यम = सूर्य, वा अग्नि वा चन्द्र असे मत मांडतात.

### अ) यम = सूर्य

Ehni ने यम = अस्ताला जाऊ पाहणारा सूर्य असे मत मांडले आहे. विवस्वान् = उदयाला येणाऱ्या सूर्याचा तो पुत्र होय. सूर्याचा मार्ग मनुष्याच्या जीवनमार्गाचा सूचक मानला जातो. वेदात अस्ताला जाणारा सूर्य व मृत्युमार्गावरील मनुष्य यांना उद्देशून सारख्याच शब्दांचा उपयोग केलेला आहे. विवस्वान आणि यम ह्या शब्दांचा दृश्य व अदृश्य सूर्याला उद्देशून उपयोग आहे. Maxmuller लाही यम म्हणजे अस्ताला जाणारा सूर्य व म्हणून – मृतांचा देव असल्याचे मत ग्राह्य वाटते.

Weber च्या मते यम जाणाऱ्या दिवसाचा व यमी रात्रीची निदर्शक आहे.

### ब) यम = अग्नि

Kuhn आणि Bergaigne ह्यांना यम हे वैद्युताग्नीचे स्वरूप वाटते आणि यमीला ते मेघनाद मानतात.

### क) यम मानव आहे

Roth ला यमाचे दिव्य स्वरूप मान्य नाही. Hopkins, Oldenberg, Schermann हे संशोधक म्हणतात की यम प्रथम मानव असून यमीसह तो मानव जातीचा प्रथमोत्पादक होय. तो पहिला यज्ञकर्ता, पृथ्वीचा राजा व अधिपति होता. यमाचे निवासस्थान हेच आर्यांचे प्राचीन मूळस्थान होय. व तो प्रथम जन्मलेला असल्यामुळे साहजिकच प्रथम मृत्यू स्वीकारणाराही तोच होता. त्याने मृतांची एक वसाहत निर्माण केली जेथे त्यानंतर मृत्यू पावणारे सर्व गेले. त्याने त्यांच्याकरिता मार्ग शोधला. जो पितृपूजेचे सूचक चिन्ह होय. वेदात प्रथम दिसणाऱ्या यम–पूजेचे हे स्वरूप होय. यम हा पृथ्वीवरील सुवर्ण-युगाचा राजा होय. यम दुसऱ्या जगात गेला आणि त्याच्याबरोबर अंगिरस गेले.










### ड) यम = चन्द्र

Hillebrandt म्हणतो की विवस्वत् म्हणजे सूर्य देवता. वैदिक पुराणकथा आणि विधिविधान यात यम आणि विवस्वत् यांच्यात परस्परविरोध दिसतो.

यम सूर्य देवता नसली तरी देवता आहे. अनेक वैदिक परिच्छेदावरून यम मर्त्य नाही. पण यम प्रथम मृत्यू पावलेला– " मर्त्य " होय.

१) यम सूर्यदेवतेचे अपत्य होय. २) आणि तो " मृत्यू पावतो "– ह्या दोन गोष्टींची संगति यम म्हणजे चन्द्र असे मानल्यास योग्यप्रकारे लावता येते.

सूर्यापासून चन्द्राला तेज मिळते म्हणून तो सूर्याचे अपत्य होय. चन्द्र कलेकलेने क्षीण होऊन पूर्ण नाहीसा होताना व पुन्हा वाढताना आपण पाहतो. हाच काव्यात्मदृष्टचा त्याचा मृत्यू व पुनर्जन्म होय. ( १.१६४.४; १०.५५.५ इ. )

मानववंशशास्त्रीय पुराव्याने ह्या मताला बरीच पुष्टी मिळाली आहे. प्राचीन काळी लोक चन्द्राच्या ह्या दोन अवस्थांचा जन्म-मृत्यूशी संबंध जोडीत; व चंद्राला मृत पितरांचा अधिपति मानीत. चन्द्र हा यज्ञाचा दूत होय. तो हवींची देवतात विभागणी करतो. ( १.१०५.४ )

एन्. अय्यंगार देखील यम म्हणजे सूर्यापासून उत्पन्न झालेला चन्द्र असेच मानतात. पण त्यांनी यमीला रोहिणी म्हटले आहे.

### डॉ. दाण्डेकरांचा दृष्टिकोण

' विकसनशील पुराणकथा ' ह्या आपल्या सिद्धान्ताच्या आधारावर डॉ. दांडेकरांनी यमासंबंधीचे विवरण केले आहे. त्यामुळे यमाला मानव मानणाऱ्यांच्या विचारांना ते प्राधान्य देतात.

वैदिक देवतामंदिरातील यम हीं दुय्यम प्रतीची देवता होय. वैदिक संदर्भांनी ती देवता असल्याचे सांगितले आहे. त्याचा मानव म्हणून कुठेही निर्देश नाही. पण तो मर्त्य आहे. त्याने प्रथम मृत्यू स्वीकारला. मानवजातीच्या उत्पत्तिमधील एक आवश्यक अट म्हणून त्याने आत्मबलिदान केले. ऋ. १०.१३.४ मध्ये ह्याचा निर्देश आहे. त्याचे राज्य म्हणजे स्वर्ग. येथे विश्वोत्पत्ति व मानवोत्पत्तिकरिता यमाने केलेल्या कार्याचा व यज्ञाशी असलेला त्याचा निकट संबंध ह्याचा पुरेसा उलगडा झालेला नाही.

तुलनात्मक पुराणकथा व तुलनात्मक भाषाशास्त्र यांच्या साह्याने यमाचा प्रश्न सोडवावयास हवा.

यम ह्या अमर्त्यदेवतेने अमरतेचा तिरस्कार करून आत्मबलिदानाच्या कृत्याने देवता व प्रजा दोघांचेही कल्याण साधले. देवांनी विश्वोत्पत्ति आणि मानवोत्पत्तिकरिता आरंभिलेल्या यज्ञात इभि म्हणून यमाने स्वतःला अर्पण केले. ह्या आत्मबलिदानापासून प्रजोत्पत्ति झाली. १०.१३.४ व पुरुषसूक्त ह्यातून ह्या प्रथम यज्ञाचा निर्देश आहे. यज्ञापासून जगदुत्पत्ति झाल्याचे व मनुष्यजात निर्माण झाल्याचे निर्देश प्राचीन विश्वोत्पत्तिविषयक पुराणकथातून अनेकदा आलेले आहेत, व त्यावर प्राचीन जमातींचा विश्वासही आहे.

भाषाशास्त्राच्या आधारे यमाचा अवेस्त्यातील 'यिमांशी संबंध जोडता येतो. यम, यिम आणि इतरही Jumis आदि शब्दाचा ' जुळा ' असा अर्थ आहे. असा भाषाशास्त्राचा आणि Ymir ची कथा आदींचा उल्लेख करून पुढे डॉ. दाण्डेकरांनी यम द्विलिंगी प्राणी असल्याचे आपले मत सांगितले. त्याने पुढे नर-नारी स्वरूपात स्वतःला विभागले ते जुळे बन्धु-भगिनी स्वरूपाचे मानले. हेच मनुष्यजातीचे माता-पिता. यमावरून अनुकरणाने यमी नाव तयार झाले.

यमाबद्दलच्या पुराणकथेतील द्विलिंगावस्थेतील यम ही पहिली व यम-यमी संवादात दिसणारी ही दुसरी अवस्था होय.

डॉ. दाण्डेकरांच्या मते ऋ. १०.१० त वैदिक कवीला मनुष्यजातीचा उत्पादक असा बन्धु-भगिनी समागम दाखविणे रूढ नैतिक कल्पनांच्या विरोधी वाटले व कवीने कथेतील मूळ हेतूला कलाटणी दिली. आणि भगिनीच्या स्वैर विलासी वृत्तीला कडक विरोध करणारा यम आपल्यापुढे उभा केला. बन्धु-भगिनी-समागम अमान्य दाखवून यम-यमी हे मनुष्य जातीचे प्रथम माता-पिता नाहीत हेच सुचविण्याचा कवीचा हेतू आहे. पण काही मुद्दे कथेचे मूळ स्वरूप



अनुक्रमणिका





उघड करतात. यमी अपत्योत्पत्तीस अति उत्सुक आहे. यमाहून अन्य पुरुष नाहीच असे ती सूक्ताच्या ३ ऱ्या ऋचेत स्पष्ट करते. ह्यावरून यम प्रथम मानव असल्याचे सिद्ध होत नाही काय ? सद्यःस्थितीत सूक्त एकदम संपल्यासारखे वाटते. दोघांच्या समागमासंबंधाने कवी काहीच स्पष्टपणे सांगत नाही. कारण ते कवीच्या हेतूला बाधक असणार ! ह्या सूक्तावरून ही जुळी भावंडे मानवजातीच्या उत्पत्तीची आद्य प्रवर्तक असल्याचेच स्पष्ट होते.

प्राचीन संस्कृतीतील यम-यमी सदृश कथांच्यामुळे डॉ. दांडेकर आदि संशोधक १०-१० वर अशी विपरीत टीका करीत आहेत. अशा प्रकारच्या सर्व कथा Father Heras ह्यांनी लोकापुढे आणल्या. अवेस्ता, बायबल आदि धर्मग्रंथातून आणि आइस्लॅण्ड, आफ्रिका, चीन मादागास्कर, निलगिरीतील Todas ह्यांच्यात प्रचलित असलेल्या प्रजोत्पत्तिविषयक कथांचे यम-यमी कथेशी साम्य असल्याचे अनेकांना वाटते. यम-यमी हे मानवांचे प्रथम मातापिता आहेत हे सिद्ध करण्यास उपयुक्त वाटणारे काही वैदिक उतारे ब्राह्मणग्रंथातून दिले जातात.

## यम मनुष्यजातीचा पिता होता काय ?

यम हा यमी आणि मनुष्य-जात यांचा पिता होता यासंबंधी विद्वानात एकमत नाही. जुन्या संस्कृतीतील कथा त्याला पोषक असतीलही पण भारतीय संस्कृति यमाकडे मनुष्य-जातीचा पिता म्हणून पहात नाही हे सत्य आहे. ऋग्वेदात तसा निर्देश नाही. तसेच ब्राह्मण ग्रंथातील संदिग्ध उताऱ्यांना त्यात आधार नाही आणि संपूर्ण संस्कृत साहित्याने याबाबत मौनच स्वीकारले आहे. मनुष्यजातीचे माता पिता म्हणून यम-यमींचा निर्देश कोठेच मिळत नाही. १०.१० चा कवि तर बंधु-भगिनी-समागम तिरस्कृतच मानतो आहे. ऋग्वेद काली वा त्यानंतरही भारतीय संस्कृतीने यमाला मनुष्य-जातीचा पिता मानलेले नाही. हे अशा प्रकारे स्पष्ट आहे.

वरील कल्पना भारतीय संस्कृतीला मान्यच नसल्यामुळे तत्सदृश अशा इतर संस्कृतीतील कथांचा काय उपयोग ? ह्या तशा कथा जरी असल्या तरी त्या निरनिराळ्या कालावधीतील असणार आणि स्थलान्तरे करीत असता बऱ्याच बदललेल्या असणार अशा ठिकाणी Geldner आणि Pischel ह्यांचे उद्गार महत्वाचे ठरतात : " The Rigveda is a book of Indian character, it is an Indian *document to be understood* & explained as such. Hence no unIndian thing must be interpreted from it "

भारतीय परंपरेनुसार मनु हा मानवजातीचा पिता होय (१.८०.१६) तो पहिला मानव व पहिला यज्ञकर्ता होय. संस्कृतमधील मनुष्यवाचक मानव, मनुज, मनुष्य इ. सर्व शब्द मनूपासून तयार झाले आहेत. त्यात मन् to think हा धातु दिसतो. मनूने आपल्या इडा नामक कन्येशी समागम केल्याचे (शत. ब्रा. १.८.१.७,११ विष्णुपुराण ४.१) आणि तिला अनेक अपत्ये झाल्याचे (१०.८६.२३) निर्देश मिळतात. मनु हा मानवपिता असल्याचीही कथा जवळ जवळ सर्व पुराणातून आलेली आहे. ह्या कन्येचे नाव कोठे कोठे 'शतरूपा' आढळते एवढेच ! मनु हा विवस्वानाचा पुत्र होय. प्राचीन संस्कृतीतून येणाऱ्या प्रजोत्पत्तिविषयक कथा ह्या मनुकथेशी जुळणाऱ्या आहेत हे उघड आहे.

त्यामुळे यम-यमीचे नाते बदलून त्यांना मनुष्य जातीचे माता-पिता हे कधीच नसलेले नवे स्वरूप देण्याची गरज नाही. मनु-कथा ही डॉ. दांडेकरांच्या सिद्धांताला पोषक नसल्याने त्यांनी ती रूढ ठरविली. १०.१० सूत्राबरील त्यांचे दोषारोपही त्यामुळे निराधार ठरतात.

वैदिक कवीला मनुष्यजातीच्या उत्पत्तिसंबंधीची एखादी कथा अस्तित्वात असल्याचे ठाऊकही नाही. त्याची यम-यमी ही पात्रे खरोखर अगदी मनापासून बोलणारी आहेत. संवादातील पात्रेच तसे बोलत आहेत मग यम-यमी खेरीज दुसऱ्या मनुष्याचे वा स्त्रीचे अस्तित्व मानण्यात गैर ते काय ? इतरत्र यम-यमीच्या माता-पित्याचा निर्देश मिळत असूनही त्याबाबत " कवीला मागाहून सुचलेला तो विचार








आहे " असे उद्‌गार संयुक्तिक वाटत नाहीत. फक्त गंधर्व म्हणजे विवस्वान् व आप्या-योषा म्हणजे सरण्यू एवढे स्पष्ट केले म्हणजे झाले. सूक्त एकदम संपल्यासारखे वाटते हा आरोपही योग्य वाटत नाही. यमीच्या विलासी वृत्तीचा यमाने कडक निषेध केला आणि तेथेच संवाद संपला. असंतुष्ट यमीला टाकून यम निघून गेला. हाच तशा प्रकारच्या संवादाचा सहज व तर्काला पटेलसा शेवट होय. अशा प्रकारे डॉ. दांडेकरांनी गृहीत धरलेली कथा (उत्पत्तिविषयक) – हा आश्रयासिद्ध हेत्वाभास आहे.

डॉ. दांडेकरांनी दिलेल्या इतर कथा ह्या मनु-कथेशी जुळणाऱ्या आहेत. ब्राह्मणग्रंथातील उताऱ्यांना जास्त महत्व न देणेच श्रेयस्कर. कित्येक वेळा ही ब्राह्मणे वैदिक परिच्छेदांच्या अर्थाबाबत दिशाभूल करतात, व परस्परविरोधी विधाने करतात. यिम आणि यम यांच्यात भाषाशास्त्रदृष्टचा साम्य असू शकते. उत्पत्तिकथेतील बन्धुभगिनी-समागम यिमाशी संबंधित आहे यमाशी नव्हे, यम हा द्विलिंग प्राणी असल्याचे Prof. Guntert यांचे डॉ. दांडेकराना मान्य मत स्वागतार्ह नाही असे नाही. पण मुख्य मुद्दा असा की सूक्त १०. १० मनुष्य-उत्पत्ति-विषयक कथेशी संबंधित नाही. व मानवांचा पिता हे यमाचे स्वरूपही नाही.

## यम म्हणजे चन्द्र

वैदिक देवता ह्या निसर्गशक्ती होत असे मानले तर यम-यमी संवादाचे स्पष्टीकरण अगदी योग्य प्रकारे करता येते.

निसर्गातील ह्या ना त्या शक्तीला वा निसर्गातील घटनेला समोर ठेवूनच ऋग्वेदातील जवळ जवळ सर्व देवता तयार झालेल्या आहेत. आणि यम देखील ह्या सामान्य नियमाला अपवाद नाही. यमाला विवस्वानाचा पुत्र म्हणून वैदिक ऋषींनी यम कोण ह्यासंबंधाने आपल्याला सूचक माहिती दिलेली आहे. वैदिक ऋषी वस्तूचे सूचक वर्णन करीत (परोक्षप्रिया हि देवाः प्रत्यक्षद्विषः।) व त्या वर्णनातील गुप्तता कटाक्षाने व प्रयत्नपूर्वक जपत असत. 'यम' हे देखील त्यांचे एक 'गुपित' आहे. त्यांनी चन्द्राला दिलेले 'यम' हे गुप्त नाव आहे. Hillebrandt ने यम = चन्द्र हे समीकरण प्रथम मांडले. डॉ. दाण्डेकरांनी ह्या समीकरणाच्या मान्यतेबाबत जे हरकतीचे मुद्दे उपस्थित केले त्यांचे निराकरण करता येते.

त्यांच्या मते विवस्वानाची कार्ये व स्वरूप स्पष्ट नाही.

विवस्वानाची कार्ये, स्वरूप--स्पष्ट असो वा नसो; मुख्य मुद्दा यम हा विवस्वानाचा पुत्र आहे हे वैदिक उताऱ्यांनी (१०.१४.१--५ इ.) स्पष्टपणे म्हटले आहे. विवस्वान् = सूर्य होय. आणि चन्द्र त्याचा पुत्र--कारण तो त्याच्या तेजाने प्रकाशतो. यम हा विवस्वानाचा पुत्र म्हणून यम = चन्द्र हे तर्कदृष्टचा स्पष्ट आहे.

यम आणि विवस्वान् यांच्या संबंधात डॉ. दाण्डेकरांना विरोध आणि विसंगति वाटते तिचे निराकरण असे: अथर्ववेदातील १८.२.३२, १८.२ ६३ पाहिल्यास तशी विसंगति नाही हे स्पष्ट होते. उलट त्यांची कार्ये व अवस्था यातील विरोध स्पष्ट होऊन तो योग्यच वाटतो. यमाला 'मर्त्य' म्हटले आहे. 'मनुष्य' म्हटलेले नाही. अमर्त्य देवात तो मर्त्य देव आहे. (१०.१०.३.)

यमाची चंद्राशी एकरूपता दाखविली की त्याच्या मृत्यूसंबंधाने समाधानकारक स्पष्टीकरण देता येते. आकाशात प्रकाशणाऱ्या चन्द्राचा मृत्यू सर्वांना दिसणारा आहे. ज्याचा मृत्यू सर्वांना पाहता येतो असा चन्द्र हा एकटाच देव आहे. ह्या निसर्गातील घटनेचा वैदिक मनावर उमटलेला ठसा यम देवतेच्या रूपात दिसतो. जी देवता मर्त्य आहे. म्हणूनच मृत्यूला–यमाचा मार्ग, – (१.३८.५), मृत्युबन्धू, यमाचा दूत असे म्हणून त्याची मृत्यूशी एकता दर्शविली. (१.६४.४ इत्यादि) यमाला पितरांचा राजा म्हटलेले आहे. मृताचे निश्चित असे गन्तव्य स्थान त्यानेच प्रथम जाणले (१०.१४.२) यमाचा मृत्यू देखील कायम स्वरूपाचा नाही.

यज्ञैरथर्वा प्रथमः पथस्तते ततः
सूर्यो व्रतपा वेन आजनि ।
आ गा आजदुशना काव्यः सचा
यमस्य जातममृतं यजामहे ॥ १.८३.५







--या ऋचेत स्पष्ट शब्दात यमाच्या मृत्युरहित जन्माची स्तुति आहे.

ही घटना चन्द्राच्या पाक्षिक जन्ममृत्युसंबंधातील आहे. ती चंद्राच्या पूर्ण क्षयानंतरच्या उदयाला द्योतित करते.

ऋ. १०.१३.४ ही डॉ. दाण्डेकरांच्या सिद्धान्ताची खरी आधार ऋचा ! ती अशी –

देवेभ्यः कमवृणीत मृत्युं प्रजायै
कममृतं नावृणीत ।
बृहस्पतिं यज्ञमकृण्वत ऋषिं प्रियां
यमस्तन्वं प्रारिरेचीत् ॥

ह्याही ऋचेत यमाच्या ( चन्द्राच्या ) यज्ञासाठी केलेल्या आत्माहुतीचे यथार्थ वर्णन आहे. दर अमावास्येला देवांना उद्देशून दर्शेष्टि केली जाते. पुरुषसूक्तातील यज्ञाप्रमाणे हेदेखील यज्ञाचे रूपकात्मक वर्णन होय. चंद्राचा मृत्यु हा देवांना उद्देशून केल्या जाणाऱ्या यज्ञांच्या प्रारंभाचा सूचक आहे. हाच त्या यज्ञाचा अर्थ आहे. देवांच्यामध्ये प्रथम मृत्यू स्वीकारणाच्या यमाची कल्पना वैदिक कवींच्या कल्पनाशक्तीला उत्तेजित करण्यास पुरेशी होती. यम हा प्रथम मृत्यू स्वीकारणारा मनुष्य नव्हे. पहिला मनुष्य म्हणून मनूलाच भारतीय परंपरा जाणते; यमाला नव्हे. तो यम मनुष्यजातीचा पिता नव्हे हे ओघाने आलेच.

यम हा प्रथम यज्ञकर्ता व आहुती असल्याचे स्पष्टीकरण पुढील प्रकारे देता येते – पौर्णिमा व अमावास्या या दिवशी होणाऱ्या यज्ञविधीत यमाचे साहाय्य असते. पौर्णिमेला होणाऱ्या यज्ञात तो यज्ञकर्ता तर अमावास्येला होणाऱ्या यज्ञात तो हवि असतो. ( यमे अध्वरोनिविष्टः । – अथर्व. – १८.२.३२ )

१०.१० ह्या यम-यमी संवादसूक्तातून व्यक्त होणाऱ्या भावना ह्या वैदिक ऋषीच्या अत्युत्कट कवित्व-शक्तीच्या द्योतक आहेत. त्याबद्दल कवी स्तुतीलाच पात्र आहे. यमीच्या वचनातून तिची कामवासना उघड असता १०.१० संवादाला उत्पत्तिविषयक मानण्यात नवीन ते काय ? चंद्र ( यम ) आणि रात्र ( यमी ) ह्या जुळ्यातील तो रूपकात्मक स्वरूपाचा संवाद आहे.

'यम' शब्दाचा सर्व भाषाशास्त्रज्ञांनी मान्य केलेला व परंपरेने प्राप्त असलेला अर्थ 'जुळा' हा आहे. चंद्र हा रात्रीचा ( यम यमीचा ) जुळा आहे. कारण दोघेही बरोबर येतात व बरोबरच असतात. असे हे साधे, सहजप्राप्त, सगळ्यांना पटेलसे स्पष्टीकरण असता ज्या गोष्टी संवादाशी संबंधित नाहीत त्या आणण्याची गरज आहे असे वाटत नाही.

वैदिक ऋषी आपल्या रहस्यांचे नेहमी रक्षण करताना दिसतात; व देवतांच्यामधील गूढ एकात्मता उघड होऊ देत नाहीत. ह्याच हेतूने त्यांनी चन्द्र व यम यांचा वेगवेगळा निर्देश केला असावा. पण ती गोष्ट दोघांच्या एकतेत बाधा आणणारी नाही. ते दोघे पुराणकल्पनान्वये एक आहेत. १०.१६४.४६ मध्ये यमाचे अनेक देवतांशी सांगितलेले एकत्व हे वैचित्र्य आणण्याच्या हेतूने आहे. ह्यामुळेच कित्येकदा ब्राह्मण ग्रंथ व नंतरचे वाङमय वेदातील रहस्यांचा उलगडा करण्यात असमर्थ ठरले आहेत.

## अधिक पुरावा

इतरही अनेक मुद्दे यम म्हणजे चन्द्र ह्या एकतेला पुष्टि देणारे आहेत.

१) यमाजवळ कुत्रे असतात. घुबड व कपोत हे त्याचे दूत आहेत. – ह्यावरून यम ही रात्रीशी संबंधित देवता असल्याचा निष्कर्ष निघतो. कारण कुत्रे हे रात्रीच्या वेळी पहारेकऱ्याचे काम करणारे असतात. व घुबड आदि प्राणी सूर्यास्तानंतरच हालचाल करणारे आहेत.

२) सर्व छन्द यमात राहतात असे म्हटले आहे. ( १०.१४.१६, अथर्व :– १८.२ ६, ५२ ). ही गोष्ट रात्रीच शक्य आहे. ज्यावेळी सर्व ब्राह्मण विश्रान्ति घेत असतात. छन्द शब्द याठिकाणी वैदिक मंत्राकरिता आलेला आहे. ब्राह्मणांच्या विश्रान्तीच्या समयी मंत्र हे चन्द्राच्या ताब्यात असतात. आपल्या कलांच्या द्वारे यज्ञाचे नियमन करणाऱ्या देवतेच्या स्वाधीन ते मंत्र असणे योग्यच आहे.

३ ) यमाचा वरुणाशी ( आकाशाशी संबद्ध देवता ) सहवास सांगितलेला आहे. (१०.१४.७)












तसेच अग्नी, (१०.६४.३) मातरिश्वा यांच्याशी त्याचा सहवास्तव्य–हे यम ही आकाश व रात्र याशी संबद्ध देवता असल्याचे सांगते आणि विशेष म्हणजे–

४) यमाला पितरांचा राजा म्हटलेले आहे. तो पितरांना निवासासाठी स्थान देतो. त्याचे निवास-स्थान आकाशात फार दूर, अत्युच्च पर्वतावर, नदीच्या पलिकडे आहे ते स्थान म्हणजे– स्वर्ग, तिसरे आणि अत्युच्च स्थान. तो स्वर्ग देवांचे निवासस्थान आहे. त्याला – 'देवमान' 'हर्म्य' 'यमस्य सदनम्' म्हणतात. तेथे निरंतर संगीत आणि सुख आहे. उपनिषदे आपल्याला सांगतात की स्वर्ग चन्द्रात आहे –

उदा०– बृहदारण्यकोपनिषद– १.३.१६; ६.२.१६
छान्दोग्य उपनि० – ५.१०.४
कौषीतकी उपनि० १.२ -, २.१२
जैमिनीय . . . – ३.१४.६ इत्यादि.

ह्यात आणि उपनिषदातील अशाच वाक्यात अनुस्यूत कल्पना अशी –

"चन्द्र हे देवांचे सोमपात्र असून देव वारंवार ते रिकामे करतात व भरतात. चन्द्राचा क्षय व वृद्धि हीदेखील मृतात्म्यांच्या तेथून परतण्याशी व तेथे जाण्याशी संबंधित आहे. चन्द्र म्हणजेच स्वर्ग होय; तोच पुण्यवान् पितरांचे निवासस्थान आहे.

पुनर्जन्माच्या कल्पनेप्रमाणे – मनुष्यजन्म म्हणजे आत्म्याचा प्रथम जन्म नव्हे, तर चन्द्रातून परतणे होय. तेथे (चन्द्रात) तो आत्मा आपल्या पूर्व-जन्मातील सुकृताची फळे भोगतो.

देवयान व पितृयाण या दोन्ही मार्गातील 'चन्द्र' हे एक 'विश्रान्तिस्थान' होय. फरक असा की पितृयाण मार्गातील 'चन्द्र' हे "प्राप्तव्य स्थान" आहे तर देवयान मार्गातील ते "विश्रामस्थान" आहे. पितृयाण मार्गाने जाणारे आपल्या सुकृताचा साठा संपेपर्यन्त चन्द्रात राहतात.

उपनिषदांच्या अनुसार अशा रीतीने चन्द्र हे मृतांचे निवासस्थान होय आणि यमाला पुण्यवान् पितरांचा राजा म्हटले आहे. यावरूनही यम=चन्द्र हेच सिद्ध होते.

त्याची जुळी बहीण यमी म्हणजे रात्र.

---










पुस्तक-परामर्श

# दुसऱ्या महायुद्धाचा इतिहास : खंड ५*

## ( जपानविरुद्ध लढाई )

इतिहास लिहावे तर ब्रिटिशांनीच, असे म्हणण्या-इतपत राणीच्या सरकारी प्रकाशनांची परंपरा थोर आहे. तपशीलवार माहिती, कालक्रमानुसार घटनांची नोंद आणि भूगोलाची नीट ओळख व्हावी म्हणून मोठ्या प्रमाणावर काढलेले नकाशे हे अशा इतिहासाचे विशेष ठरून गेले आहेत. ह्या जुन्या परंपरेत छान शोभणारा असा हा जपानी युद्धाचा खंड आहे.

आधीच युद्धकथा रम्य; त्यातून ही जपानशी झालेल्या दोस्तराष्ट्रीय युद्धकथा विशेष रम्य होय. कारण ही लढाई एके ठिकाणी केंद्रित नव्हती. किंबहुना विस्तृत अशा प्रदेशावर ती विस्तारलेली होती. सागरी आणि हवाई दलांचीही बहुमोलाची कामगिरी त्या व्यापक लढाईत होती आणि मुख्य म्हणजे अपूर्व असे अणुबाँब वापरून ही लढाई दोस्तांनी जिंकली होती. जपानी पराभव करण्यासाठी हे ब्रह्मास्त्र दोस्त राष्ट्रांनी वापरले होते.

### चार भाग

हा जपानवरील चढाईचा– अखेरीस जपानला जेरीस आणले– तो इतिहास चार विभागात सांगितला. पहिला "सीएक" प्रगतीचा, फेब्रु–मे १९४५ या काळातला. दुसरा पॅसिफिक विभागातल्या चढाईचा, त्याला "प्रशांत" सागर कसे म्हणावे ? ह्याची कालमर्यादा मार्च–ऑगस्ट १९४५. ह्यात जपानची शरणागति (ऑगस्ट १९४५) येते खरी; पण तेवढ्याने युद्ध संपत नाही. म्हणजे लढाईची उत्तर-क्रिया ही तिसऱ्या विभागात सांगितली (ऑगस्ट १९४५ नोव्हेंबर १९४६) कारण विखुरलेल्या आशिया खंडात जपानी सत्ता तात्पुरती अधिकार गाजवीत होती. तिला पकडून जपानी बेटावर तिची रवानगी. तिथले "युद्धकैदी" ताब्यात घेऊन त्यांची आपापल्या देशात रवानगी– दोस्तराष्ट्रांच्या कैदेतल्या जपानी नागरिकांची व शिपायांची माहेरी पाठवण . . . . ह्या मुख्य जबाबदारीच्या कार्याकडे लक्ष देणे आवश्यक होते. शिवाय त्या त्या ठिकाणी नव्या सत्तेची स्थापना हे आपाततः येणारे कार्य होते. ब्रह्मदेश, मलाया, सयाम, जावा-सुमात्रा, फ्रेंच इंडो-चायना . . . . . अशा किती तरी ठिकाणा-बाबत ही दुहेरी जबाबदारी यशस्वी ठरलेल्या दोस्त राष्ट्रांवर जपानी पराभवामुळे ओढवलेली होती–ती टाळता येणारी नव्हती. म्हणून हा तिसरा विभाग प्रदीर्घ वाटतो- १८ महिन्यांचा ! चवथा विभाग सिंहावलोकनाचा– जपानशी लढाई का करावी लागली ? तिची उद्दिष्टे वेळोवेळी कशी ठरली ? आणि ही पीतपीडा (= यलो पेरिल) टाळण्या-साठी अमेरिकनांच्या सहकार्याने अणुबाँब फेक कशी केली . . . . . . इत्यादि ऐतिहासिक घटनांकडे फेकलेला हा दृष्टिक्षेप– विशेष महत्त्वाचा ठरतो. कारण यात दोस्तराष्ट्रांच्या मनोवृत्तीचे प्रदर्शन चांगले झाले आहे. इतिहासाचा गाभा हाच होय असे आम्हास वाटते.

### नकाशांचे महत्व

माहितीत काही उणेपणा उरू नये म्हणून ३२ परिशिष्टे (पृ. ४३९–५४६) जोडली आहेत. लष्करी हालचालींचे यथार्थ ज्ञान व्हावे यासाठी मोठ्या परिश्रमाने बनविलेले नकाशे आणि आराखडे ३३ ठिकठिकाणी जोडले आहेत. नकाशाचे महत्त्व

* ले. मे. ज. एस्. वुडवर्न किर्बी आणि इतर; प्र. राणीसरकारचे प्रकाशन– लंडन किं. ६ गिनी : पृ. ५९९








अशासाठी की एरव्ही नकाशावर ठिपक्याएवढी दिसणारी अनेक ठिकाणे ह्या दुसऱ्या युद्धामुळे प्रभावी ठरली. त्यांचा विस्तार, त्यांच्याशी संपर्क साधण्या-बाबत अडचणी– त्यांचे लष्करी महत्त्व इत्यादि गोष्टींचा उलगडा, त्यांचे नकाशे पहाताच व्हावा, असे उपयुक्त नकाशे काढले- ते ह्या इतिहासात सामावले. ओकिनावा, क्युशू, कोकोस, बिसयान ... ही बेटे नकाशावर आढळतात– ती पहावी म्हणजे मोठ्या प्रमाणावरच्या नकाशांची आवश्यकता सहज पटते. शिवाय प्रत्यक्ष अनुभूति आणणारी छायाचित्रे ( ३५ ) सुबक छापली असल्याने ह्या इतिहासाची उपयुक्तता वाढली आहे. जपानविरुद्ध लढलेली ही चढाई पुष्कळशी हिंदुस्थानातून सिलोनमधून चालविली होती. हिंदी लढवय्यांचा अधिकाऱ्यांचा या लढाईत प्रत्यक्ष संबंध पुष्कळ होता– दोन्ही बाजूंनी. सुभाष बोस यांच्या नेतृत्वाने तयार झालेली आझाद हिंद फौज शेवटी– युद्ध कैदी म्हणून दोस्त राष्ट्रांच्या हाती पडली. आधी दोस्तांकडील लढवय्ये– म्हणून जपानी अधिकाऱ्यांनी पकडलेले हे युद्धकैदीच होते. भारतीय रेल्वे, कारखाने, व्यापारी, लढवय्ये, यांचा ह्या चढाईत बराच मोठा हिस्सा असल्याने ह्या इतिहासाचे महत्त्व आम्हासही विशेष वाटते– वाटावयास हवे.

## पापांचा घडा

दोस्तराष्ट्रांनी मिळून जपानचा असा पराभव करण्याचे कारण जपानने वेळोवेळी आपल्या प्रगतीचा आणि सामर्थ्याचा दुरुपयोग केला, राष्ट्रा-राष्ट्रांमधील परस्पर–सोईसाठी मानलेले करारमदार धुडकावले; शेजारच्या चीनवर चढाई केली-चिनी प्रदेश बळकावला ..... इत्यादि पापांचा घडा भरलेला दाखविल्याखेरीज दोस्तांच्या आक्रमक हल्ल्यास नैतिक अधिष्ठान लाभावे कसे ? जपानी दुष्कृत्यांची ही यादी थोडी मनोरंजक वाटते. कारण तिचा स्पष्ट उच्चार ह्या युद्धाच्या निमित्ताने झाला. तत्पूर्वी अनेक वर्षे लढाईत जपान सामील होण्यापूर्वी -सर्व राष्ट्रे मित्रभावाने नांदत होती-तेव्हा जपानी दुष्कृत्यांचा स्पष्ट निषेध का केला नाही ? तेव्हाच जपानी चढाई रोखली असती–तर जपान अधिक सोकावला नसता. परंतु प्रत्यक्ष घटनेच्या वेळी मौन पत्करून अनेक वर्षानंतर जुन्या अपकृत्यांचा जाब विचारण्यासारखा हा प्रयत्न होता. पण राजकारण हे बहुरंगी, बहुढंगी, असते- त्यात सयुक्तिकता किंवा तार्किक सुसूत्रता अपेक्षणेच गैर होय.

जपानी पापाचरणाची यादी स. १८७५ पासून सुरू होते. कुरील, बोनिन आणि ऱ्यू क्यू हे द्वीप-समूह जपानने (स. १८७५–८० दरम्यान) काबीज केले. त्यानंतर (स. १८९४–९५ मध्ये) फॉर्मोसा आणि पेस्काडोर्स यांवर जपानी झेंडा फडकू लागला. साम्राज्य वाढविण्याची ही चटक प्रथम जपानने अनुकरण करून लावून घेतली. ह्या अवधीत युरोपीय राष्ट्रे आणि अमेरिका चीनची लूट कशी पद्धतशीर करतात, हे जपानच्या नीट लक्षात आले. आणि लष्करी आणि नाविक सामर्थ्य वाढविण्याचा मूलमंत्र जपानी राष्ट्राला मिळाला. त्याचा पहिला प्रभाव रुसो-जपानी युद्धात पडला (स. १९०४–५) आणि जगभर जपानचे कौतुक झाले. एवढ्या अजस्र रशियाला (युरोपियन राष्ट्राला) छोट्या जपानने (आशियन देशाने) चीत केले. युरोपियन वर्चस्वाची आणि अजिंक्यपणाची भावना दुखविली. ह्या लढाईमुळे कोरियावर जपानचा ताबा सुरू झाला. जवळच्या लियोटुंग द्वीपकल्पाचा कारभारही जपानकडे आला आणि पाच वर्षाच्या आत कोरिया जपानी साम्राज्याचा भाग म्हणून जाहीर झाले. कोरियाच्या ह्या बदललेल्या मालकीमुळे मांचूरियाचा दक्षिण भाग जपानी " कृपादृष्टी " चा भाग ठरला.

## जपान–अमेरिका तेढ

नेमकी ही जपानी वाढती चढाई अमेरिकन मुत्सद्द्यांना बोचू लागली. कारण चीन हे फक्त आपल्या चराईचे कुरण, असा युरोपियन राष्ट्रांनी मानलेला संकेत. त्याला उघड उघड विरोध करून जपान ( – आशिआटिक जपान ! ) अमेरिकेच्या " पवित्र " क्षेत्रावर आक्रमण करतो म्हणजे काय ? हा एक मोठा उपमर्द तर होताच; पण तो जपान-कडून झाला असल्याने तो विशेष झोंबणारा ठरला. जपानी–अमेरिकेची तेढ ही अशी सुरू झाली, तिच्या












विरुद्ध उघडपणे बोलता येत नव्हते– ओरड करता येत नव्हती– म्हणून तर अमेरिकन संतापात आणखी भर पडली.

पहिल्या महायुद्धाची संधि जपानच्या पथ्यावर पडली. जर्मनी विरुद्ध त्या वेळी जपानने युद्ध आरंभिले आणि दोस्तराष्ट्रांशी हातमिळवणी केली. तहाच्या वेळी आपला प्राप्तीचा वाटादेखील जपानने बरोबर वसूल केला. पण लढाईच्या काळातच प्रशांत महासागरांतील जर्मनीच्या ताब्यातली बेटे भराभर जपानने ( दोस्त राष्ट्रांच्या वतीने ) सांभाळली. आणि नंतर राष्ट्रसंघाच्या वतीने ती सांभाळण्याची जबाबदारी पत्करली. मार्शल, कॅरोलिन आणि मारियाना ही बेटे ( द्वीपसमूह ) जपानला ( जर्मनीची होती ) मिळाली. ह्या बेटांचे लष्करी–व्यापारी महत्त्व समजण्यास प्रशांत महासागराचा एक मोठा नकाशा पहावा.

न्यू क्यू द्वीपसमूह जपान आणि फॉर्मोसा यांच्या मध्ये आहे. त्यातील मोठे बेट ओकिनावा. अमेरिकनांनी तेथे पुष्कळ विषारी धुराचे साठे ठेवले आहेत. "आमचे पूर्वीचे बेट आमच्या ताब्यात द्या" म्हणून जपानी तगादा अमेरिकेकडे चालू आहे तो याच बेटांबद्दल. ओकिनावाच्या थेट पूर्वेस १४० अक्षांशाच्या सुमारास बोनिन बेटे आहेत. बोनिनच्या दक्षिणेस ( आणि ग्वामच्या उत्तरेस ) मारियाना बेटांची माळ आहे. ग्वामच्या दक्षिणेस कॅरोलिन बेटांची आडवी रांग दिसते.

## चीनवर वर्चस्व

युरोपात महायुद्ध चालू होते. त्याचा फायदा घेण्यासाठी म्हणा किंवा अन्य काही हेतूने म्हणा, जपानने चीनवर आक्रमणाची एक पद्धतच ठरविली. स. १९१५ मध्ये चीनकडे एक खलिता धाडला आणि आमच्या "२१ अटी पत्करा" असा लकडा जपानचा सुरू झाला. कारण चीनमध्ये या वेळी एक-राज्य कुणाचे नव्हते. निरनिराळे सेनानी आपापले प्रदेश सांभाळण्यासाठी झगडत होते. मध्यवर्ती सत्ता अशी प्रस्थापित झाली नव्हती. अशा वेळी जपानने आपले घोडे पुढे दामटावे, यात आश्चर्य नव्हते. परंतु चीनच्या हिताखातर नव्हे -पण स्वतःच्या व्यापारासाठी-अमेरिकेने जपानी २१ अटी थोड्या सौम्य करविल्या. परिणामी जपानी वर्चस्व चीनवर वाढू लागले.

युरोपीय लढाईत आपले उद्योगधंदे जपानने पुष्कळ वाढविले-आणि वाढत्या धंद्यामुळे आयात -निर्यात व्यापारही वाढू लागला. आगबोटींचा व्याप वाढविला-आणि दर्यावर्दी वाहतुकीत ब्रिटनशी जपानचा विरोध आला. समुद्राची सासू म्हणून मिरविणाऱ्या ब्रिटिश नौदलाला जपानचा अभ्युदय सहन व्हावा कसा ?

**प्रकृतिः खलु सा महीयसाम् –**
**सहते नान्यसमुन्नतिं यया ।...**

असे सुभाषित–काराने सांगूनच ठेवले आहे ना ?

ब्रिटिशांचा जपानशी एक करार झाला होता. आपसात सहकार्यासाठी तो केला होता. तसाच ब्रिटन–अमेरिका–जपान असाही एक आपसातला तहनामा ( वॉशिंग्टन ट्रीटी १९२२ ) ठरला होता. त्यायोगे राष्ट्रीय लढाऊ नौदलांचे प्रमाण ठरले होते, ५ : ५ : ३. म्हणजे ब्रिटन–अमेरिका समबल रहावी; जपानने मात्र ह्या दोन्ही राष्ट्रांच्या बरोबरीस सुद्धा येऊ नये. अशी ही व्यवस्था होती. पण जपानला समानतेच्या वाऱ्याने झपाटले होते. विषमता, वर्णद्वेष, युरोपियनांना तेवढ्या खास सवलती असे कुठे काही दिसले की ठोकारण्याकडे जपानी प्रवृत्ति बळावली–आणि हा विरोध जाहीर–जग जाहीर–व्हावा अशी जपानी प्रचारी रीत होती. ब्रिटिशांशी केलेला करार, वाशिंग्टन ट्रीटी ... हे दोन्ही जपानने असेच जाहीरपणे धुडकावले. अमेरिकेत आवक होणाऱ्या राष्ट्रांची वर्ण–भेदावर प्रतवारी ठरली तेव्हा आणि आस्ट्रेलियाचे श्वेतेतरांना वसाहतीत स्थाईक होऊ न देण्याचे धोरण.... या दोन्ही अन्याय्य निर्बंधाविरुद्ध जपानने जगभर हाकाटी चालविली.

दोस्तराष्ट्रांनी जपानविरुद्ध आरोप–पत्र तयार केले. यांत ह्या सर्व गोष्टींचा समावेश आहे. त्यांच्या पार्श्वभूमीसह हे आरोप मुद्दाम थोड्या विस्ताराने सांगितले. कारण त्याखेरीज दोस्तांची मनोवृत्ति



अनुक्रमणिका






स्पष्ट होणार नाही. आता जपानी राजकारणी रथाची थोडीशी तपशीलवार माहिती सांगितली पाहिजे म्हणजे जपानचे चढाईखोर धोरण भराभर यशस्वी का झाले ते कळून येईल.

## जपानी राज-रथ

बादशहांच्या नावाने जपानी सरकारचा कारभार चालत असला तरी प्रत्यक्ष सत्ता लष्करी अधिकाऱ्यांची आणि भांडवलदारी आठ–नऊ घराण्यांची होती. मंत्रिमंडळात लष्करी नाविक दलाचे दोन प्रतिनिधी असत. त्यांच्या सल्लयाशिवाय आंतरराष्ट्रीय राजकारण चालतच नसे. किंबहुना परराष्ट्र संबंध लष्करी अधिकारीच ठरवीत. झैबित्सु म्हणजे धनिकांचा कंपू : त्यात मित्सुई, मित्सुबिशी, सुमिटोमो, यासुदा, सुसुकी... अशी आठ कुटुंबे होती. बँका, परदेशी व्यापार, सर्व मोठे उद्योगधंदे, रेशीम, साखर, पोलाद... यांची पैदास– सर्वांवर ह्या झैबित्सूंचा प्रभाव असे. म्हणजे जपानी पार्लमेंट हा एक देखावा; मंत्रिमंडळातले लष्करी प्रतिनिधी आणि "झैबित्सू" यांनी मिळून मन मानेल तसा कारभार करावा– अशी प्रत्यक्षात अवस्था होती. मांचुरियावर हल्ला चढवून जपानने तो प्रदेश बळकावला... तो अशा कारभारामुळे.

हिटलरचा उदय, मुसोलिनीचे पराक्रम, त्यांच्या वारंवार होणाऱ्या "गर्जना" जपान्यांना आवडू लागल्या. हिटलरचे उदाहरण डोळ्यापुढे ठेवून, जर्मनांची लष्करी सरशी युरोपात होते. तशी आपल्या जपानी लष्कराची आशियात झाली पाहिजे, अशी तयारी जपानची होऊ लागली. आंतरराष्ट्रीय करार झुगारून मुलुख बळकावण्याची प्रवृत्ति देखील इटलीच्या उदाहरणावरून जपानी मुत्सद्द्यांनी पत्करली की काय ?

## आशियाचे नेतृत्व

मांचुरियावर जपानी आक्रमण नक्की कुणी केले हे सांगता येणे कठिण आहे. कारण मंत्रिमंडळाच्या संमतिशिवाय ही चढाई पार पडली. लष्करी मंत्र्यांनी हा बेत पार पाडला असावा– आणि त्याला फारसा प्रतिकार झाला नाही हे समजल्यावर, हा निर्णय कुणाचा हा फुकाचा वाद वाढला नाही. पण मांचुरियानंतर उत्तरचीनच्या भागावर लष्करी काबू मिळविण्याची खटपट सुरू झाली. लष्करचा आत्मविश्वास वाढला, की मंत्रीमंडळाची दुर्बलता वाढली– कोण जाणे– परिणाम मात्र चीनवरील छुप्या चढाईचा दिसून आला. विरोधी वरिष्ठांना ठार करण्यालादेखील ही नव–जवान लष्करी पुंड मंडळी कचरली नाहीत. अशा खुनांची दाद लागणे मुष्कील झाले. अशा प्रवृत्ति बळावल्या– त्यांची उपपत्ति लष्करी चढाईची होती. ब्रिटन–अमेरिका आपल्या शेजारी चीनमध्ये वाटेल तसा धुडगुस घालत असताना, त्यांना कुणी नावे ठेवीत नाही. त्यांना पायबंदही कुणाचा नाही. मग जपानने तरी अशा मर्यादा का पाळाव्या ? ब्रिटन–अमेरिकन–मुत्सद्दी म्हणतात त्याप्रमाणे मागास राष्ट्रांचा उद्धार करण्याचे महत्कार्य जपाननेही पत्करले आहे. आशियातील सर्व राष्ट्रांचे पुढारीपण जपानकडे-त्यांच्या उद्धारासाठी जपानची खटपट आहे– अशी विचारधारा पसरविणे हे जपानी प्रचारकांचे कर्तव्य ठरले.

ह्या प्रचारामुळे ब्रिटन-अमेरिका यांची बरोबरी करणे- वेळ प्रसंगी त्यांना धुडकावणे-ह्या धैर्याच्या -शौर्याच्या बाबी ठरल्या. मग आंतरराष्ट्रीय समझोत्यासाठी भरणाऱ्या परिषदेत भाग न घेणे क्रमप्राप्त झाले. आणि ब्रिटनची अमेरिकेची बरोबरी करणे हे ध्येय ठरले. पण जपानी मंत्रिमंडळातल्या लष्करी प्रतिनिधीत मतभेद बळावले. नाविक दलाचा रोख दक्षिणेकडे : निरनिराळे द्वीपसमूह होते ते बळकावण्याकडे– ते बळकावल्या नंतर आसपासच्या प्रदेशाला शह देता येईल-अशा हेतूने. तर फौजानावाटे उत्तरेकडे पुढे पुढे सरकावे– रशियाला आणखी मागे रेटावे. - त्यांनी आपली दहशत खाललीच आहे अशा विरोधात निश्चित चढाई कुणीकडेच होईना. नाविक सामर्थ्य वाढविण्याची योजना मूळ धरू लागली आणि जपानी गोद्यांचे काम भराभर विस्तारू लागले. लष्कराची उत्तरेकडील आगेकूच रशियाविरुद्ध न होता चीनच्या रोखाने झाली. स. १९३७ मध्ये तर जपानी चिनी लढाई सुरू झाली होती. पण इतर सर्व राष्ट्रांच्या दौर्बल्यामुळे ती लढाई न समजता "इन्सिडेंट" ( साधी घटना )








मानण्याचा प्रघात पडला. या घटनेमुळे जपान युरोपियन अमेरिकन राष्ट्रापासून अलग झाला– आशियातील राष्ट्रांशीच त्याने अधिक संबंध वाढविले. आणि सोईस्कर वेळ पाहून जपानने दुसऱ्या महायुद्धात उडी घेतली. ब्रिटन-अमेरिका यांचे वर्चस्व कमी करण्याचा चंग बांधलेला जपान यावेळी त्यांच्या बाजूने लढेल हे शक्यच नव्हते– तशी अपेक्षाही कुणाची नव्हती. पण मुख्यतः अमेरिका आणि ब्रिटन यांच्याशी दोन हात करण्याची खुमखुमी जपानची असल्याने– योग्य संधीची वाट पहात लष्करी अधिकाऱ्यांनी बराच वेळ घेतला. या काळात पुष्कळ तयारी करायची होती. लोखंड, रबर, पेट्रोल– क्रूड तेल... असे पुष्कळ साहित्य साठवून ठेवायचे होते– विमाने, नौदल, लष्करी गाड्या, रणगाडे... तयार करायचे होते.

## महायुद्धात उडी

जपानची युद्धात पडण्याची इच्छा निश्चित होती, पण केव्हा हे ठरले नव्हते. हिटलरने ब्रिटनवर चालून जाण्याचे ठरविले होते– स. १९४० च्या ऑगस्ट सुमारास हिटलरने आपल्या चढाईचे वेळापत्रक ठरविले होते. ती वेळ जपानला सोईची ठरणार होती. प्रशांत महासागरातील ब्रिटिश आणि अमेरिकन वर्चस्वाला एकदम सुरुंग लावण्याचा जपानी बेत थोडा लांबणीवर पडला. कारण हिटलरचे वेळापत्रक चुकले ! ! म्हणून जपानी बेतही बदलला. मात्र ह्या अवधीत जपानने जर्मनीशी आणि इटलीशी एक समझोता करून ठेवला. हेतु हा की आशियातील ब्रिटिश–अमेरिकन वर्चस्व धुडकावून लावण्याच्या खटपटीत त्यांचे मूक–साहाय्य लाभावे, निदान विरोध होऊ नये ! ! आणि ही संमति मिळताच जपानने इंडो–चीनमध्ये आपले लष्कर उतरविले. ( सप्टें. १९४० ) ब्रिटन आणि अमेरिका यांच्या जोडीस नेदरलँड बरोबरही आपणास लढावे लागेल, ही जाणीव जपान्यांना पक्की झाल्यावर त्यांनी पूर्वतयारी म्हणून रशियाशी तटस्थतेचा करार केला ( एप्रिल १९४१ ). हेतु हा की सागरी लढाईत ब्रिटिश–अमेरिकन–डच इतके शत्रु एकवटून येतील– तेव्हा उत्तरेकडील सरहद्द पेटू नये– तिकडून रशियाने हल्ला करू नये.......

इंडो–चायनात जपानी सैन्य घुसताच दोस्तराष्ट्रांनी जपानला स्पष्ट ताकीद मिळावी म्हणून परदेशातील जपानी ठेवी आणि मालमत्ता "गोठविली." या गोठविण्यामुळे जपान अधिकच चिडून लढाईच्या तयारीस लागले. अमेरिकेला वगळावे का? तिन्ही राष्ट्रांशी एकदम तोंड द्यावे याबद्दल थोडी शहानिशा झाली आणि अमेरिकेला वगळता येणार नाही असा विचार बळावला. उलट अमेरिकन आरमारी तळच आधी उडवून लावण्यासाठी पर्ल हार्बरवर कडाक्याचा हल्ला करण्याचे जपानने ठरविले आणि अखेरीस ता. ७ डिसेंबर १९४१ रोजी ठरलेला हल्ला पर्लहार्बरवर झाला !! अमेरिकनांना तर तो अनपेक्षित होता– ब्रिटिशांनाही तो तसाच वाटला. अमेरिकन आरमार इतके गैरसावध होते की अवघ्या दोन तासात पॅसिफिक फ्लीट संपूर्ण नष्ट झाले ! ! अमेरिकेचे नाकच कापल्यासारखे झाले. इतकेही करून जपानने रीतसर लढाई पुकारली नाही ! !

## दोस्तराष्ट्रांचे धोरण

ब्रिटिशांना फार वाट पहावी लागली नाही. मलायात जपानी लष्कर उतरले. ब्रिटिश आरमारातील दोन प्रचंड नौकांना जपान्यांनी जलसमाधि दिली- समुद्रावरील सासूचे नाक हे असे कापले : पहाता पहाता कुरील बेटापासून बंगाली उपसागरापर्यंतच्या टापूत जपानी लष्कराचा धुमाकूळ सुरू झाला. ब्रिटिश-अमेरिकन आणि डच प्रतिष्ठा पार नाहीशी झाली ! ह्या जपानी औद्धत्याचे प्रायश्चित्त देण्यासाठी दोस्त राष्ट्रें किती उत्सुक होती आणि त्यांचे धोरण कसे ठरत होते- याची कल्पना त्यांच्या बैठकांवरून येते. कॅसाब्लँका ( जाने. १९४३ ) आणि कैरो ( डिसें. १९४३ ) येथील ठराव त्या दृष्टीने महत्त्वाचे वाटतात. " चढाईखोर जपानला वठणीवर आणण्यासाठी दोस्तराष्ट्रें लढत आहेत " असे म्हणून जपानला कसे वागवायचे तेही त्यांनी ठरविले. स. १८९५ जपानने ताब्यात घेतलेले सर्व प्रदेश त्याजकडून परत घेऊन ते ज्याचे त्यास परत करण्याचा ठराव एक मताने मंजूर झाला. चीनचे लचके जपानने तोडले ते चांग कैशेकच्या आग्रहा-








खातर सर्व चीनला परत द्यायचे असे ठरले. पुढे स्टालिनच्या आग्रहाखातर रशियन मुलुखही जपानी ताब्यातून परत घेण्याचे ठरले. ब्रिटन-अमेरिका यांचीही मागणी वेगळी कशी असेल ? मिळून सर्वांनी ठरविले की जपानची पुरी खोडकी जिरवायची- आतापर्यंतच्या सर्व चढाईखोरीचे प्रायश्चित्त जपानला द्यायचे ! हा फैसल्ला एक तर्फीच नव्हता का ? पण तो पक्का ठरला- त्याप्रमाणे दोस्त राष्ट्रांनी पार पाडला देखील !

## युरोपातली लढाई

मात्र त्यासाठी थोडा अवधि लागला. ब्रिटनवर जर्मन हल्ले होत होते. युरोपातली लढाई आटोक्यात आल्याखेरीज जपानचा समाचार घेण्याच्या भानगडीत पडता येत नव्हते. एक तर जपानची आघाडी फार व्यापक क्षेत्रावर पसरली होती. त्या सर्व ठिकाणी विरोध करावयाचा ही फार अवघड गोष्ट होती. आरमार आणि हवाई दल यांचे भरपूर साहाय्य आवश्यक होते; परंतु जिवावर बेतलेल्या ब्रिटनला प्रथम स्वतःला सावरण्यासाठी तरी फुरसत हवी होती. आणि विमानांचा तांडा भरपूर जमल्या- खेरीज जपानकडे ढुंकून पहायचे नाही असे अमेरिकेने ठरविले. मुसोलिनीचा पाडाव झाल्यावर इटलीत दोस्त सैन्य उतरले ( सप्टें. १९४३ ) आणि मग इटलीने शरणागति पत्करली ! ही युरोपातली कामगिरी पुरी झाली असे समजून अमेरिकेने आपल्या परीने जपानशी सामना देण्यास सुरुवात केली. न्यू गिनीच्या उत्तरेचे टोक सालमोवा ( १४ सप्टें. १९४३ ) मार्शल बेटे ( जाने. १९४४ ) ही घेऊन अमेरिकेने जपानी आरमाराला कोंडण्याचा प्रयत्न केला. फिलिपाइन्सची लढाई ( सप्टें. १९४४ ) झाली. जपानी आरमाराचा निःपात झाला– लुझोन ( फिलि०चे उत्तरटोक ) अमेरिकनांनी काबीज केले ( जाने. १९४५ ) आयोजिमा, ओकिनावा या बेटांवर अमेरिकन लष्कर उतरले. आणि हिटलरच्या मृत्यूनंतर जर्मनांनी शरणागति पत्करली ( मे १९४५ ). ब्रिटिशांनाही थोडी थोडी उसंत मिळताच त्यांनी चढाईची तयारी केली. रंगूनपर्यंतचा प्रदेश त्यांनी परत मिळविला आणि ब्रह्मदेशच्या लढाईची तयारी चालविली. ( मे १९४५ ) ( पृ. ३०–३१ )

## साधनांची चर्चा

जपानवर चढाई करून त्या राष्ट्राला नमवावे का बाँब हल्ल्याने त्याला जेरीस आणावे ? का तडजोडीने आपले उद्दिष्ट साधावे ? याबद्दल दोस्त राष्ट्रांच्या बैठकीत खलबते पुष्कळ झाली. अमेरिकन प्रेसिडेंटचे सल्लागार देखील ह्या प्रश्नांचा सांगोपांग विचार करीत होते. जपानी कडवेपणा सर्वांना ठाऊक होता. हातघाईची लढाई करायची तर "माणसाला-माणूस" बळी जाईल, ही सर्वांची खात्री होती. इतकी अमेरिकन माणसे "मारायची" का ? हा मुख्य प्रश्न प्रेसिडेंटपुढे होता. वैमानिक हल्ले चढवून, जळते पलिते फेकून "अग्न्यस्त्र" वापरण्याचा कार्यक्रम धडाक्याने चालू होता. अमेरिकन "बी २९" यांचा इतका भरपूर आणि भयंकर उपयोग इतरत्र क्वचित्‌च झाला असावा. अडीचशे–तीनशे अशी ही धुडे आकाशात घिरट्या घालीत आणि सहा-सात मोठ्या शहरांवर आगीचे लोळ अस्मानातून फेकीत. एरवी काय हा दुष्टपणा म्हटले असते; पण काय हा पराक्रम-केवढे हे शौर्य-असे उद्गार या वेळी निघाले ! कोबे टोकियो, नागोया, ओसाका या औद्योगिक, व्यापारी शहरांवर १८७० विमानांनी मिळून ८१०० टन पेटलेले पलिते आणि ४८०० टन विस्फोटक बाँब टाकले (२५ फेब्रु- २० मार्च १९४५ ). मे-जून मध्ये २७००० टन बाँब; जून-जुलैत- ५४००० टन पेटते पलिते . . . . असा ढोबळ हिशेब बाँब फेकीचा सांगता येतो. विमानांचे आणि वैमानिकांचे तपशील अधिक सांगण्याचे कारण नाही. जपानी घरांची पडझड, बेघर झालेल्या लोकांचा आकडा, मृतांची संख्या . . . हाही तपशील अनावश्यक वाटतो. असो. ( पृ. १०१–१०५ )

जपानी मुत्सद्द्यांना आणि सेनानींना कळून चुकले की आता आपल्याच्याने तग धरवत नाही. तेव्हा त्यांनी रशियामार्फत खटपट चालविली. मध्यस्थी करा– तह घडवून आणा–अशी राजनैतिक विनंती रशियन राजदूताकरवी स्टालिनकडे गेली ही








बातमी अमेरिकन हेरांनीं मिळविली. पण स्टालिनने बड्या चौघांच्या बैठकीत हा सर्व खुलासा आपण होऊन सांगितला. आपण नकार स्पष्टपणे कळविला असल्याचेही जाहीर केले. (पृ. १९१-२)

## अणुबाँबचा विचार

लढाईमुळे भरपूर खाद्य मिळत होते तरी यमराजांची भूक शमली नव्हती. रूझवेल्ट (१२ एप्रिल) मुसोलिनी (२९ एप्रिल), हिटलर (१ मे?) अशी बडी बडी प्रस्थे यमराजांनीं स्वधर्मी नेली. ह्या घटनांचा प्रभाव जपानी लढाईवर झाला. शिवाय निवडणुकीत चर्चिलपक्षाचे बळ पुष्कळच कमी होऊन त्यांच्या ऐवजी मजूर-पक्षीय अटली पंतप्रधान झाले. राष्ट्रसंघाचीही स्थापना (जून २६) याचवेळी झाली. तेव्हा जपानी युद्धाची परिसमाप्ति कशी करावी, याची बव्हंशी जबाबदारी अमेरिकेवरच पडली. याच सुमारास "अणुबाँब" बद्दल एक महत्त्वाची कर्तबगारी साध्य झाली. अणुबाँब तयार करता येणे, तो इष्ट स्थळी पोचवून लक्ष्यावर नेमका टाकणे, याबद्दल अनेक प्रयोग चालू होते. त्यात शत्रूवर (= जपानवर) अॅटम बाँब टाकता येतील, हे ता. २६ जुलै १९४५ ठरले. अणुबाँबच्या कर्तबगारीचा परिचय अमेरिकेमार्फत जगाला झाला. ता. १६ जुलै १९४५ पहिल्या चाचणी अणु बाँबची खबर प्रेसिडेंट ट्रूमनला कळविली. न्यूमेक्सिकोमध्ये ही स्फोट-चाचणी पार पडली. तिच्या प्रभावाची-पराक्रमाची जाणीव होण्यास चार पाच दिवस लागले. ता. २३ रोजी तज्ञांना अंदाज आला की जपानवर टाकण्यासाठी बाँब १५ दिवसात तयार होईल. फार तर १० ऑगस्टपर्यंत बाँब टाकता येईल. पण ह्या काळात जपानला द्यावयाच्या निर्वाणीच्या खलित्याची निश्चित शब्दयोजना ठरावयाची होती. अणु बाँबची भीति दाखवावी की नाही? बादशहाबद्दल उल्लेख कसा करावा? निर्वाणीचा हा खलिता कुणा कुणाला (दोस्त राष्ट्रांपैकी) दाखवावा का न दाखविता प्रसिद्ध करावा? अशा अनेक वादग्रस्त बाबींचा निर्णय ठरावयाचा होता. (पृ. १८८-९०)

प्रत्यक्ष अणुबाँब बनविण्याबाबत, त्याच्या घोर परिणामाविषयी, एकंदर खर्चाच्या मंजुरीबद्दल-अनेक तपशील ठरायचे होते. ते कसे ठरवावे आणि लष्करी निर्णयाला मुलकी अधिकाऱ्यांची संभाव्य हरकत कशी टाळावी याविषयी गुप्त कारस्थाने शिजू लागली. ती अमेरिकन सेनानींची होती. अणु बाँब जपानवर टाकण्यास ब्रिटिश-रशियन संमति असल्याने इतरत्र वाच्यता होऊन आपला बेत फसू नये, बाँब वापरण्याची संधि चुकू नये म्हणून अमेरिकन युद्ध-कचेरीने पुष्कळ दक्षता घेतली. मारिआना बेटांवरून जपानवर बाँब फेकी, पेटते पलिते फेकी, विमाने जात- तेथेच अॅटम बाँब तयार करून (जुळवून) तो जपानवर टाकावा हा बेत शेवटपर्यंत गुप्त ठेवला. जपानला पाठविलेल्या निर्वाणीच्या खलित्यात एक सूचक वाक्य शेवटी आहे: जपान शरण आले नाही तर "**संपूर्ण आणि तत्काळ विनाश निश्चित ठरलेला**" अशी ताकीद देऊनही शरणागतीचे चिन्ह दिसेना. तेव्हा अॅटम बाँब टाकणे अपरिहार्य झाले.

याही बाबतीत अमेरिकन यंत्रणा नमुनेदार म्हटली पाहिजे. अणु बांब टाकण्याचे कार्य कुणी पत्करावे हे ठरवून, त्यांना मारिआनांत आणून ठेवले. ऑगस्ट ४-१० या काळात केव्हा तरी जपानवर अणुबाँब टाकावा हा हुकूम सही शिक्यानिशी तयार होता. त्यात बदल असला तरच युद्धखात्याच्या चिटणीसास प्रेसिडेंटने कळवावे, अशी तजवीज होती. (पृ. १९०-१)

## निर्वाणीचा खलिता

दोस्त राष्ट्रांनी जपानला दिलेला निर्वाणीचा खलिता "पॉटस्डॅम डिक्लरेशन" म्हणून प्रसिद्ध आहे. तो जपानी अधिकाऱ्यांच्या हातीं ता. २७ जुलै रोजी सकाळीच पडला. पण त्यावरील प्रतिक्रिया जाहीर होण्यास वेळ लागला. जपानी रेडिओने काय करावे- वृत्तपत्रांनी बातमी कशी छापावी... त्यावरील भाष्य कसे लिहावे, इत्यादि प्रश्नांवर जपानचे भवितव्य ठरणार होते- जपानवर अणुबाँब टाकायचा की नाही, हे त्यावेळी ठरावयाचे होते. पण अणुबाँब किंवा त्याचा अनर्थकारी प्रभाव याबद्दल जपान्यांना माहिती होती कुठे? खुद्द

लष्करी अधिकाऱ्यांनाही ती नव्हती मग इतरे जनांची काय कथा ?

जपानी लष्करी अधिकारी त्या खलित्यामुळे खवळले होते. कारण त्यांच्या विरुद्ध जनतेला चिथावणी त्यात होती. जपानच्या पराभवाची, सर्वनाशाची, जबाबदारी लष्करी प्रमुखांवर टाकली होती; त्यांच्या जाहीर चौकशीची व्यवस्था खलित्यात जाहीर झाली होती. तेव्हा ते सुखासुखी शरणागति पत्करतील हे शक्य नव्हते. तो खलिता जपानी पंतप्रधानांनी ठुकरून लावल्याचे जाहीर करावे, असा आग्रह सेनानींचा होता. जपानी वृत्तपत्रांनी तो खलिता काटछाट करून छापला. लष्करी अधिकाऱ्यांना शिक्षा होईल इत्यादि मजकूर गाळून खलिता छापला. टीपही अशी जोडली की सरकारी धोरण "हा खलिता विचारात घेण्यासारखा नाही" असे आहे. जपानी संपादक, पंतप्रधान, लष्करी सेनानी यात वाचावाची सुरू राहिली. लोकमताला वावच नव्हता. लढाई चालू ठेवण्यास ते कंटाळले होते. . . . . एवढ्यात पत्रकारांशी बातचीत करताना प्रधानांनी जपानी सरकारी धोरणाची वाच्यता केली : "खलित्याला काही महत्त्व नाही : लढाई चालू ठेवण्याचा आमचा निर्धार कायम आहे." (पृ. २०७)

## हिरोशिमा नागासाकी

जुलै ३० रोजी जपानी वृत्तपत्रात हे धोरण जाहीर झाले. ऑगस्ट उजाडताच अमेरिकन वीरांचे हात शिवशिवू लागले. ता. ६ रोजी सकाळी सवा आठ वाजता हिरोशिमावर अणुबाँब टाकला. नेम बरोबर होता. स्फोटही योजल्याप्रमाणे शहरावर झाला. आवाज, आगीचे डोंब, आणि तीव्र उष्णता ... ... यांच्या माऱ्याने सर्वत्र हलकल्लोळ माजला. त्यांचा प्रभाव– (पृ. २०७)

७८१५० इसम मृत
५१०४८ भाजून व इतर प्रकारे जखमी
४८००० इमारती नष्ट
२२१७८ इमारतींची पडझड
१७६९८७ इसम बेघर

–एवढे नुकसान झाले खरे; पण त्याची माहिती टोकिओमध्ये नव्हती. ता. ७ ऑगस्ट रोजी प्रे. ट्रूमनने जाहीरपणे कबूल केले की "हिरोशिमावर अणुबाँब टाकला आणि जपानने शरणागति पत्करली नाही तर आणखीही अणुबाँब टाकावे लागतील." ह्या धमकीचा उपयोग काही झाला नाही. जपानी सेनानींचे म्हणणे असे : आम्ही शरणागति पत्करणार नाही. आम्ही समजा जपानी बेटावरचे अधिकारी शरण गेलो, तरी इतरत्र विखुरलेल्या जपानी लष्कराचे काय ? शत्रूच्या स्वाधीन होण्यापेक्षा ते शिपाई- अधिकारी भराभर हाराकिरी ( = आत्महत्या ) करतील. त्यांनी तशी शपथच बादशहाच्या नावाने घेतली आहे" (पृ. २०९). मुलकी मंत्र्यांचा सल्ला व्यवहारी होता. बादशहा कायम ठेवल्यास आपण शरणागति पत्करावी. पण लष्करी आग्रहापुढे त्यांचे काही चालले नाही.

एवढ्यात ता. ९ ऑगस्ट रोजी नागासाकीवर ॲटमबाँब टाकला (स. ११॥ वाजता). हा बाँब अपेक्षित ठिकाणी फुटला नाही. तरी २३,७५३ माणसे मेली; ४३०२० जखमी झाली.

## रशियन चढाई

रशियाने एवढ्यातच जपानविरुद्ध लढाई पुकारली आणि चढाई आरंभिली देखील ! तिन्ही दिशांनी एकदम १४–१५ ठिकाणी रशियन सेना जपानी ताब्यातल्या प्रदेशावर चालून गेल्या आणि फारसा विरोध न होता त्या पुढे पुढे सरकू लागल्या. पृ. १८१ समोरचा नकाशा (नं. १०) त्या दृष्टीने फार बोलका आहे. ह्या हल्ल्यामुळे जपानची तीव्र निराशा झाली. रशियाची मध्यस्थी आपणास उपयोगी पडेल ही आशा फोल ठरली ! ! रशियाने जपानकडील आपल्या मुलखावर आधीपासून हक्क सांगितला होता– आणि चांग कै शेकच्या संमतीने तो दोस्तांनी मान्यही केला होता. म्हणजे जपानने बळकावलेल्या मुलखाची वाटणी तो परत मिळण्यापूर्वी ठरली होती.

अणुबाँबचा प्रभाव राष्ट्रभर कळायला उशीर लागला खरा : पण लष्करी मंत्र्यांचा अट्टाहास,







मुलकी मंत्र्यांचा शरणागति पत्करण्याचा सल्ला अशा दुहेरी पेचात बादशहावर पडलेले संकट, त्यातून मोठ्या धैर्याने बादशहाने घेतलेला व्यवहारी निर्णय, तो विश्वासार्ह नाही असे म्हणण्याची जपानी कडवी राजनिष्ठा, पण तो पक्का आहे, बादशहांचाच आहे असे कळताच भराभर वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या आत्महत्या . . . . तत्त्वनिष्ठ जपानी जवानांच्या संतापाचा अतिरेक . . . तडजोड पत्करणाऱ्या अधिकाऱ्यांवर प्राण घातक हल्ले . . . हा सर्व प्रकार मोठा लोकविलक्षण वाटतो ! ! ( पृ. २१०–२० ).

### व्यापक उत्तरकार्य

जपानची शरणागति म्हणजे लढाई– प्रत्यक्ष हाणामारी– तेवढी संपली. पण ह्या जपानी लढाईचे उत्तरकार्य विशेष व्यापक–विशेष गुंतागुंतीचे, त्रासदायक आणि खर्चाचे होते. पहिली गोष्ट म्हणजे खुद्द जपानवर ताबा. तेथील सर्व व्यवस्था चालू ठेवायची: बादशहाचे बाहुले सन्मानाने, योग्य इतमामाने वागवावयाचे; दीड–दोन लाख फौज जपानात ठिकठिकाणी पांगून ठेवायची. हे मुख्य काम अमेरिकेने पत्करले. फौज बव्हंशी अमेरिकन असली तरी इतर दोस्त राष्ट्रांनी थोडे थोडे लढवय्ये "भरतीसाठी" पाठविले.

दुसरे काम चांग कै शेकला चीनमध्ये अधिकारावर ठेवायचे आणि तिसरे काम सर्व पांगलेल्या जपान्यांना परत जपानमध्ये धाडायचे आणि युद्धकैद्यांची सुटका करून त्यांची त्या त्या देशांत रवाना करायची. हे पुरे झाल्याखेरीज लढाई संपली असे म्हणता येणार नव्हते. जपानी सेना पुष्कळ ठिकाणी पांगली होती. कारण लढाईच्या पहिल्या जोषात जे जे मुलुख ताब्यात आले ते ताब्यात घेणाऱ्या जपानी लष्कराने शरणागति पत्करली नव्हती आणि त्यांना ती पत्करायला लावणे हे महाकठिण काम होते. शरणागति न पत्करता कुणी अधिकाऱ्याने किंवा साध्या शिपायाने आत्मबलिदानाचा मार्ग पत्करला, तरी त्यांच्या उत्तरक्रियेची जबाबदारी ही निराळीच होती. मिळून काय, जपानी सैनिक ताब्यात घेणे आणि ते स्वदेशी धाडणे ही मोठीच जबाबदारी होती. जपान्यांकडून घेतलेल्या प्रदेशावर पुनः नव्याने कुठली तरी सत्ता स्थापणे आवश्यक होते. इन्डोनेशिया बाबत, जावा-बद्दल हा प्रश्न विशेष अवघड होता. सुमारे १० लाख जपानी सैनिक आणि व्यापारी वगैरे पर-देशात होते. त्यांना "मोकळे कैदी" म्हणून आपल्या खर्चाने जपानात पोचविण्याचे काम किती बिकट असले पाहिजे याची कल्पना करावी. हे सर्व काम लॉर्ड मौंटबॅटनवर पडले आणि त्यांनी ते व्यवस्थित पार पाडले. हा सर्व इतिहास जपानी युद्धाच्या इतिहास–खंडात येतो. तो तपशीलवार, तारीखवार व प्रदेशवार सांगण्याचे कार्य कुशलतेने, सावधानीने आणि इतिहासकारांच्या दृष्टीने साधले आहे, याबद्दल शंका नाही. असा ताजा इतिहास वाचतांना वाचक रंगून जातो. त्यावेळी न कळलेली कारणे आता निवेदनाच्या ओघात सहज समजतात . . . म्हणून आनंद होतो.

### परिशिष्टांचा परिचय

मुख्य ग्रंथपरिचय झाल्यानंतर आता अवशिष्ट कर्म म्हणून परिशिष्टांची ओळख सांगायची. लष्करी हालचालींची, त्यांच्या वेळापत्रकांची, विमानांच्या तळाची वगैरे तपशील भरपूर आहेत. जपानची हलाखी हा माहितीपूर्ण प्रबंध म्हणजे परि० ११. लढाईपूर्वी आणि लढाई चालू असता धंदेवार हलाखी कसकशी येत गेली, वस्तुवार टंचाई कशी भासत असली पाहिजे हा तपशील जपान्यांच्या सहनशक्तीचे दर्शन घडविणारा आहे. (पृ. ४६५–८१) हिंदुस्थानातून लढाईसाठी साहित्य महापारीने कसकसे गेले याची यादी परि. १३ मध्ये आहे. सुमारे २६००० मोटारी ९ महिन्यात (फेब्रु–आक्टो १९४५) चिनी रणभूमीसाठी रवाना झाल्या ! युद्धविरामानंतर जपानव्याप्त प्रदेशात व्यवस्था राखण्यासाठी भारतीय सैन्याला कुठे कुठे पाठविले होते हा तपशील परि० २५ मध्ये आहे. जपान्यांनी युद्धकैद्यांना कसे वागविले ? त्यांच्या तावडीत कितीजण सापडले ? किती मेले ? किती वाचले इत्यादि आकडेवारी परि० ३० मध्ये आढळते. (पृ. ५३२–५४१) कोणत्या मोहि-








मांत दोस्तांचा सैन्य-नाश किती कसा झाला याची यादी परि. ३१ मध्ये आहे: त्यावरून समजते की दप्तरातल्या हिशेबाप्रमाणे—

१८२९३ मृत्यु
४९१८७ जखमी
१६२,०५१ बेपत्ता अगर कैदी

असा सुमारे सवादोन लाख लढवय्यांचा हिशेब लागतो. डिसेंबर १९४१ ते नोव्हेंबर १९४६ च्या दरम्यान घडलेली ही हानि आहे.

## वैचारिक चर्चा

जपानी युद्धाच्या अशा परिसमाप्तीनंतर दोन तीन प्रश्न उद्भवतात : (१) जपानला अशी क्रूर शिक्षा करण्यासारखा त्या राष्ट्राचा गुन्हा कोणता ? इतर वसाहतवादी राष्ट्रांनी आपले वर्चस्व वाढविण्या-करतां जी कृत्ये केली, तीच जपानने केली होती. (२) अणुबाँब तडकाफडकी जपानवर वापरला— तसा तो युरोपमधील कुठल्याही देशावर वापरला असता काय ? (३) जपानने केलेल्या अन्यायांबद्दल त्या राष्ट्राला शिक्षा करणारांचे हात तरी स्वच्छ, शुद्ध होते काय ? शिक्षा करताना त्यांनी किती मोठे- घोर- अन्याय केले ?

असल्या प्रश्नांना उत्तरे कुणी देत नाही. हे वैचारिक वाद होत, पण त्यांचे महत्त्व कमी नाही. जपान हे आशियन राष्ट्र, युरोपियन नव्हे, हा फरक युरोपीय-अमेरिकन मनात कायमचे घर करून बसला असल्याने जपानने वसाहतवाद्यांचे अनु-करण केले हाच मुळी घोर अपराध ठरला ? पोर्तुगी-जांनी "इन्क्विझिशन"च्या नावाखाली क्रौर्य प्रकट केले. रेडइंडियनांना अमेरिकेत, किंवा कित्येक आफ्रि-कन जमातींना रानटी जनावरांसारख्या गोळ्या घालून ठार करणारांचे आचरण अमानुष ठरले, त्यांना शासन कुणी का केले नाही ? त्यांचा इतर बाबतीत गौरव कमी झाला नाही. मग जपान्यांनाच असे वेगळे वागविण्याचे कारण वर्णद्वेष असे का समजू नये ?

जपान्यांना शासन करावे- अशा प्रकारचे शासन करावे, हे ठरविणाऱ्या तीन बड्यांपैकी एकजण जपान्यांचा शेजारी होता: आशियन होता- पीत वंशी होता- ही सबब फोल ठरते. कारण जपान काय किंवा चीन काय, दोन्हीही बौद्धधर्मीय राष्ट्रे असली तरी युरोपियन राष्ट्रांप्रमाणे ती* विद्वेषाने भारलेली आहेत. फ्रान्स, इंग्लंड, फ्रान्स-जर्मनी किंवा इंग्लंड-जर्मनी यांचे पिढीजाद राष्ट्रीय वैर सहज लक्षात येते. तीच गोष्ट इतर राष्ट्रांबाबत आहे. कोरिया, मांचुरिया व शेजारचे इतर प्रदेश यावर जपानी हुकमत सुजनपणाची तर नव्हतीच; ती इतकी दुष्टपणाची होती की तीबद्दल गुरुदेव टागोर आणि महात्मा गांधी यांनी त्यावेळी स्पष्ट तीव्र निषेध व्यक्त केला होता. तेव्हा हाही गुण जपानने वसाहतवादाच्या अनुकरणाने आत्मसात केला की काय ? आणि ह्या विद्वेषामुळे जपानवर ही दोस्तराष्ट्रप्रणीत आपत्ति कोसळली, असे आपण समजू या.

## वॉशिंग्टनची उत्सुकता

परंतु अणुबाँबचे काय ? आम्हास तर असे दिसते की ह्या नव्या शस्त्राचा प्रभाव पहाण्यासाठी अमेरिकन लष्करी अधिकारी आसुसलेले होते. तसे पाहिले तर बक्षिस मिळालेल्या कुऱ्हाडीची धार पहाण्यासाठी जॉर्ज वाशिंग्टन किती उत्सुक होता. ही कथा वेगळ्या संदर्भात- बदललेल्या परिस्थितीत- खरी ठरते ! विशेषत: अणुबाँब बाबतच्या शोधांच्या, स्फोटाच्या तारखा, तो जपानजवळ मारिआना बेटात "जुळविण्याची" हिकमत- त्या हिकमती-साठी केलेली पूर्वतयारी यावरून अमेरिकन उत्सुकतेची कल्पना येते. त्यांच्या आतुरतेविषयी तर्क बळावतो. हे शस्त्र हाती आले खरे; पण त्याचा प्रत्यक्ष उपयोग करण्यास संधी होती कुठे ? प्रेसिडेंट रुझवेल्ट ऐवजी ट्रुमन अधिकारारूढ होते, हीदेखील अमेरिकनांना अनुकूल संधी होती. मजूर मंत्रि-मंडळाचा आपणास फारसा पाठिंबा मिळणार नाही अशी भीति कदाचित् त्यांना वाटली असावी. म्हणून स्टालिनला "तोंडी कळविले" तसेच ब्रिटिश पंतप्रधानांना न कळविता, "लॉर्ड मौंटबॅटन ना "सांगितले" - या सांगोवांगी आधारावर अमेरि-

* कुणाचाही द्वेष करावयाचा नाही ह्या भारतीय वैशिष्टयाचे महत्त्व अशा प्रसंगाने पटते.








कन युद्धनेते अधिक विसंबले, असे वाटते. जपानी युद्धाची संधी अपूर्व होती यात शंका नाही. स. १९४५ नंतरच्या २५-२६ वर्षांत अणुबाँबचा उपयोग करण्याची संधी पुनः मिळाली नाही, यावरून जपानी संधीचे महत्त्व पटते. मात्र निर्वाणीच्या खलित्यांत प्रत्यक्ष अणुबाँबचा उल्लेख कां केला नाही, "संपूर्ण आणि तत्काळ विनाश" होईल अशी संदिग्ध धमकी का दिली हे कळत नाही. कोणत्याही क्षणी आपल्यावर निर्बंध येईल, हे ब्रह्मास्त्र वापरण्यास आपणदेखील कचरू अशी भीति दोस्तराष्ट्रांस वाटली– की त्यांनादेखील ह्या खऱ्या अस्त्राचा उपयोग होईल हे स्पष्टपणे कळविले नव्हते ? ही अणुबाँब चर्चा न संपणारी आहे. मानवाच्या हाती हे केवढे प्रभावी हिंस्र कोलित आहे, ही जाणीव भीतिप्रद आहे. हिंदुस्थानने अणुबाँब करावा, असा आग्रह धरणारांनी हा इतिहास चाळून पहावा अशी विनंती करावीशी वाटते. असो.

## बायबल वचन

"निष्पाप असेल त्याने पहिला दगड मारावा" या अर्थाचे बायबल वचन आहे. त्या आधारे जपानला शिक्षा करणारांचे– करू पहाणारांचे आंतरराष्ट्रीय आचरण तपासण्याजोगे आहे. वसाहतवाद, साम्राज्यवाद किंवा साधा स्वार्थी व्यापार, यानिमित्ताने त्या त्या राष्ट्रांनी कोणती पापे करायची ठेविली होती ? कोणत्या पापांबद्दल प्रायश्चित्ते भोगून आत्मशुद्धि साधली होती, म्हणून त्यांना जपानला शासन करण्याचा अधिकार प्राप्त झाला होता ? . . . . इत्यादि प्रश्न ह्या युद्धाचा इतिहास वाचताना सुचतात. आणि वर्ण–भेदाचे भूत अद्यापही पाश्चात्यांच्या मानेवर बसले असल्याचे प्रत्यंतर मिळते. अस्तु.

अशा ह्या इतिहास-ग्रंथाचे परीक्षण करताना भरतवाक्य म्हणावयाचे ते हे---

## भरतवाक्य

दुसऱ्या महायुद्धात जपानने दोस्तराष्ट्रांविरुद्ध लढाई दिली. पहिल्या पहिल्याने जपानी मुसंडीची सरशी झाली. अमेरिका आणि ब्रिटन अशा उभय प्रबळांना ती जपानी सरशी चांगलीच भोवली. दोस्त राष्ट्रांचे उद्दिष्ट "चढाईखोरांना विरोध" असे अस्पष्ट असले तरी जपानचे उद्दिष्ट सुस्पष्ट होते : आशियातील–प्रशांत महासागरातील ( आशियन प्रदेशात ) अमेरिका–ब्रिटन यांचे वर्चस्व उखडून टाकणे. प्रत्यक्ष युद्धामुळे ते साधले नाही, जपानला नामुष्कीची शरणागति पत्करावी लागली तरी अखेरीस जपानी उद्दिष्ट साध्य झाले– आशियात ब्रिटिश, डच, अमेरिकन इत्यादिकांची सत्ता उरली नाही. जपानचे उद्दिष्ट हेच होते. जपानच्या ह्या कर्तबगारीची जाणीव अनेक आशियन राष्ट्रांना आहे.

युरोपियन–अमेरिकन–जपानी व्याप्त असे प्रदेश आता बहुतेक स्वतंत्र झाले; त्यातील काहींनी ब्रिटिश राष्ट्रकुल पत्करले; कित्येकांनी अलिप्तता स्वीकारली. काही थोड्यांनी कम्युनिस्ट चीनशी सहकार्य केले. "कम्युनिस्ट चीन" ही दुसऱ्या महायुद्धाचीच प्रत्यक्ष देणगी म्हटली पाहिजे– जपानला नमवून, चीनचे सामर्थ्य वाढविण्याचा हा इतिहास ह्या पांचव्या खंडात आढळतो. म्हणून ह्या इतिहासाचे विशेष महत्त्व. म्हणुनच त्या इतिहासाची ही ओळख.

**– श्री. रा. टिकेकर**








डॉ. वसंत स. जोशी

साहित्य अकादमी पुरस्कार मिळविणारे

# थोर संशोधक श्री. शं. बा. जोशी

आपल्या चतुरस्र बुद्धिमत्तेने आणि मूलगामी संशोधनाने कानडी व मराठी साहित्यात मोलाची भर टाकणारे धारवाडचे थोर संशोधक श्री. शं. बा. जोशी यांना या वर्षीचा साहित्य अकादमीचा पाच हजार रुपयांचा पुरस्कार देण्यात आला. त्यांच्या 'कर्नाटक संस्कृतीय पूर्वपीठिके' या विद्वन्मान्य ग्रंथाबद्दल हे पारितोषिक देण्यात आले. मराठी वाचकांना त्यांच्या 'मऱ्हाटी संस्कृति' या आंतर भारतीने प्रकाशित केलेल्या ग्रंथामुळे व 'नवभारता'तील 'नार' व 'आप' संप्रदाय, 'अदिति व अंभृणि' यासारख्या संशोधनपर लेखनाने ते चांगलेच परिचित आहेत. 'मऱ्हाटी संस्कृति' या त्यांच्या ग्रंथाने मराठी साहित्य-क्षेत्रात मोठी खळबळ उडाली होती. त्यातील काही विधानांनी वादाची रणे माजली, तर काही मते आता कालाच्या ओघात टिकून स्वीकार्यही वाटू लागली आहेत. त्यांनी मांडलेल्या विचारांच्या दिशेने अजूनही बरीच वाटचाल करावी लागणार आहे याचीही जाणीव जाणत्या संशोधकांना झाली आहे. त्यांच्या या ग्रंथाचा उलटसुलभ चर्चा होऊन मराठी वाचकांना चांगला परिचय झालेला आहे.

श्री. शंकर बाळदीक्षित जोशी यांचा जन्म म्हैसूर राज्याच्या बेळगाव जिल्ह्यातील गुर्लहोसूर या धार्मिक व सांस्कृतिकदृष्टया प्रसिद्ध गावी ४ जानेवारी १८९६ रोजी झाला. सुप्रसिद्ध मराठी नाटककार श्री. अण्णासाहेब किर्लोस्कर हेही याच गावचे ! घरची सांपत्तिक स्थिती चांगली नसल्यामुळे त्यांना उच्च शिक्षण तर नाहीच; परंतु माध्यमिक शिक्षण घेणेही शक्य झाले नाही तथापि प्राथमिक कानडी शिक्षण घेतल्यानंतर धारवाड येथील प्रायमरी टीचर्स ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन येथे ते प्रशिक्षणासाठी दाखल झाले. तेथून तीन वर्षाचा शिक्षणक्रम त्यांनी १९१९ मध्ये संपविला. त्यात यशस्वी झालेल्या विद्यार्थ्यांत त्यांनी दुसरा क्रमांक संपादन केला.

त्यानंतर १९२० मध्ये चिकोडी येथे त्यांची प्राथमिक शिक्षक म्हणून नियुक्ती झाली. त्यावेळी असहकाराची चळवळ सर्वत्र फोफावली होती. स्वतंत्र बुद्धीच्या आणि भारतीय संस्कृतीचे अथांग प्रेम असणाऱ्या श्री. जोशींनी राष्ट्रसेवेच्या आणि दास्यमुक्तीच्या या संग्रामात भाग घेण्यासाठी सरकारी नोकरी सोडली आणि ते धारवाडास आले आणि शक्य त्या रीतीने असहकार आंदोलनात त्यांनी भाग घेतला. १९२१ मध्ये भारतीय क्रांतिकारक श्री. अरविंद घोष यांच्या जीवनावर त्यांनी एक ग्रंथ लिहून प्रकाशित केला. वाचकांनी आणि वृत्तपत्रांनी त्याचे मोठे स्वागत केले. आणि आपल्यातील लेखनसामर्थ्याचा श्री. शं. बा. ना साक्षात्कार झाला. नवलेखनाची प्रेरणा मिळाली, नवी उमेद प्राप्त झाली. याचवेळी इंग्लिश भाषा व वाङमयाच्या अध्ययनाची निकड त्यांना जाणवली आणि एकलव्याच्या जिद्दीने त्यांनी इंग्लिश भाषा आत्मसात केली.

याच सुमारास गुरुदेव श्री. रामभाऊ रानडे यांनी आपल्या 'कन्स्ट्रक्टिव्ह सर्वे ऑफ उपनिषद' या सुप्रसिद्ध ग्रंथाचे कानडीत भाषांतर करण्याची जबाबदारी श्री. रंगराव दिवाकर यांचेवर सोपविली. श्री. दिवाकर यांनी याकामात सहकार्य करण्याकरिता श्री. द. रा. बेन्द्रे आणि श्री. शं. बा. जोशी यांना बोलावून घेतले. या ग्रंथाचे भाषान्तर १९३० मध्ये प्रसिद्ध झाले. 'कर्मवीर' हे राष्ट्रीय विचारसरणीचे साप्ताहिक त्यावेळी धारवाड येथून प्रसिद्ध होत होते. श्री. रंगराव दिवाकर व श्री. हुक्केरी हे त्याचे संपादक होते. राष्ट्रीय



अनुक्रमणिका

चळवळीत भाग घेतल्याबद्दल या उभयतांना तुरुंगवास पत्करावा लागला. त्यावेळी श्री. व्यंकटराव अलूर आणि श्री. शं. बा. जोशी यानी 'कर्मवीर'च्या संपादनाचे काम केले.

चरितार्थाकरिता याकाळात श्री. शं. बा. जोशीनी धारवाड येथील माध्यमिक शाळात शिक्षकाची नोकरी पत्करली. १९२७-२८ मध्ये धारवाडच्या कर्नाटक हायस्कूल मध्ये व त्यानंतर १९२८ ते १९४७ पर्यंत विद्यारण्यहायस्कूल (पूर्वीचे व्हिक्टोरिया हायस्कूल) मध्ये त्यानी शिक्षक म्हणून काम केले. शिक्षकाचा व्यवसाय करीत असतानाच त्यानी कर्नाटकाच्या सांस्कृतिक पुनरुत्थानाच्या चळवळीत सक्रिय भाग घेतला. त्यासाठी अनेक ठिकाणी त्यानी भाषणे दिली. खास लेख लिहिले आणि अपूर्व जागृती घडवून आणली.

कानडी, मराठी, संस्कृत व इंग्लिश या भाषांवरती त्यांचे चांगले प्रभुत्व आहे. वेदोपनिषदांचा त्यांचा गाढा व्यासंग आहे. भाषेतील शब्दाशब्दातून प्रकट होणारे संस्कृतीचे स्वरूप त्यांच्या मर्मग्राही दृष्टीस लागलीच प्रतीत होते. एखाद्या विषयाचा अत्यंत खोल तपशीलात जाऊन ते अभ्यास करतात आणि प्रस्थापित विचारांपेक्षा स्वतंत्र, अभिनव असा दृष्टिकोन मांडतात. त्यानी अशा तऱ्हेने चिंतन, मननातून, सखोल व्यासंगातून स्फुरलेले विचार ग्रंथरूपाने वेळोवेळी प्रसिद्ध केले. त्यातील विचारांच्या अभिनवतेने व क्रांतिकारकत्वाने ते ग्रंथ आजही विचार-प्रवर्तक ठरले आहेत.

श्री. शं. बा. जोशी यांची आजपर्यंत प्रसिद्ध झालेली ग्रंथसंपदा अशी आहे*:– (१) कण्मरेयाद कन्नड (१९३३) (२) महाराष्ट्रद मूल किंवा मूल महाराष्ट्र (१९३४) (३) कन्नूडिय हुट्टु (१९३५) (४) कर्नाटकद वीर क्षत्रियरु (१९३६) या ग्रंथास जुन्या म्हैसूर राज्याचे देवराज बहादुर प्राइज मिळाले होते. (५) कन्नड नेले. (१९३९) मुंबई सरकार प्रकाशन या ग्रंथासही देवराज बहादुर प्राइज मिळाले होते. (६) शिवरहस्य (१९३९) (७) समाजदर्शन (१९४५) (८) कन्नड कते (१९४९) (९) यक्ष प्रश्ने (१९४८) (१०) कर्णन मूरु कतेगळु (१९४७) (११) कन्नड नुडिय जीवाळ (१९५०) बॉम्बे युनिव्हर्सिटी रिसर्च पब्लिकेशन (१२) मऱ्हाटी संस्कृति (मराठी) (१९५२) आंतर भारती प्रकाशन, मुंबई. (१३) हालु मत दर्शन. (१९६०.) (१४) कर्नाटक संस्कृतीय पूर्वपाठिके (१९६७.) साहित्य अकादमी पुरस्कारप्राप्त ग्रंथ. याशिवाय त्यांची 'अग्निविद्या (१९४३) व 'सौंदर्यविचार' (१९४९.) ही अन्य प्रकाशने आहेत, सध्या त्यांचा 'ऋग्वेद सार किंवा नागप्रतिमा दर्शन' हा ग्रंथ छापला जात असून तो म्हैसूर युनिव्हर्सिटीतर्फे प्रकाशित होणार आहे.

श्री. शं. बा. जोशी हे स्वकर्तृत्वाने घडलेले एक तेजस्वी व्यक्तिमत्त्व आहे. कर्नाटक व भारतीय संस्कृतच्या विविधांगांचा शोध घेण्याचा त्यांचा सातत्याने प्रामाणिक प्रयत्न सुरू असतो. असहकाराच्या चळवळीत त्यानी हिरीरीने भाग घेतला, तरी अन्य पुढाऱ्यांच्या हातचे बाहुले असे ते कधीच बनून राहिले नाहीत. त्यानी स्वतःचे संशोधन क्षेत्र निवडले आणि त्यात त्यानी एक क्रांतिकारक विचारवंत आणि संशोधक विद्वान म्हणून नावलौकिक संपादन केला. ते अत्यंत स्वाभिमानी असून तत्त्वाच्या बाबतीत त्यांनी कधीही तडजोड केली नाही. योग्य संधीच्या अभावी त्याना खूप त्रास व तोटा सहन करावा लागला. पण त्यानी आपल्या जीवनाला या अडचणींना तोंड देण्यायोग्य वळण लावले. आपल्या प्रपंचासाठी किंवा कार्यासाठी आर्थिक साहाय्यही कोणाकडून मिळविण्याचा त्यानी कधी प्रयत्न केला नाही.

श्री. शं. बा. जोशी याना प्राप्त झालेले हे अपूर्व यश सहजासहजी मिळालेले नाही. त्याना त्यासाठी उपेक्षा, टीका, निंदा, एकाकीपणा या सर्व प्रक्रियांतून जावे लागले आहे. त्यांच्या लौकिकाचा अकारण द्वेष करणाऱ्या कित्येक तथाकथित विद्वानांनी त्यांच्या ग्रंथाविरोधी टीकेचे वादळ उठवून त्याना खाली ओढण्याचा आटोकाट प्रयत्न केला स्वतंत्र व प्रखर बुद्धिमत्तेमुळे कोणाचेही लांगूल-

* ही माहिती पुरविल्याबद्दल प्रि. व्ही के. होलीकट्टी, धारवाड यांचा मी आभारी आहे.

चालन न करता आपले मार्गक्रमण करणाऱ्या शं. बा. ना कोणाच्या रागालोभाची पर्वा करण्याची आवश्यकता नव्हती. त्यांची निस्पृहता, निर्भयता आणि स्पष्टवक्तेपणा स्वाभाविकच कित्येक स्वहित-दक्ष व्यक्तींच्या रोषास पात्र झाला. आणि त्यांचे कित्येक मान-सन्मान हिरावले गेले; पण आज साहित्य अकादमीच्या राष्ट्रीय पुरस्काराने त्यांच्या थोर संशोधन कार्याचे उचित मूल्यमापन झाले आहे. श्री. शं. बा जोशी यांचे संशोधन परंपरा-ग्रस्त समाजाला धक्के देणारे असते. त्यामुळे सनातनी कर्मठांचा विरोधही त्याना सहन करावा लागला आहे. १९३९ साली त्यांचे 'शिव रहस्य' हे पुस्तक प्रसिद्ध झाले, तेव्हा काही कट्टर शिवोपासक तरुण चिडले व त्याना मारहाण-करण्याचा प्रयत्नही बेल्लारी येथे झाला. पण त्यांच्यातीलच कित्येक अनोळखी पण त्या ग्रंथा-तील विचारांनी आकृष्ट झालेल्या तरुणांनी त्या जमावाला आवरले व शं. बां. च्या विचारांची योग्य ओळख त्याना करून दिली 'मऱ्हाटी संस्कृति' या ग्रंथातील प्रक्षोभक विचारांनी मराठी नियत-कालिके व विद्वान यांचेकडूनही त्याना खूप टीका सहन करावी लागली. टीकेला ते कधीच भीत नाहीत. त्याना वाईट याचेच वाटते, की मूलगामी संशोधन करून त्यांच्या संशोधनास तोडीस तोड पुरावे सादर न करता पूर्वग्रहयुक्त लेखनच केले जाते! त्यांच्या संशोधनपर ग्रंथातील अनेक मूलगामी विचा-रांनी खळबळ माजून नाव मिळावे, अशी त्यांची इच्छा नाही. त्या दिशेने नव्या पिढीतील संशोधकांनी विचार व कार्यप्रवृत्त व्हावे असेच त्याना वाटते.

साहित्य अकादमीने त्यांच्या ज्या 'कर्नाटक संस्कृतीय पूर्वपीठिके' या ग्रंथास पुरस्कार दिला, तो कर्नाटक संस्कृतीची पूर्वपरंपरा सांगणारा व तिच्या अनेकांगांवर नव्यानेच प्रकाश टाकणारा असा ग्रंथ आहे. १९६७ साली त्यांच्या या ग्रंथावर त्यावेळचे कर्नाटक विश्वविद्यालयाचे कुलगुरु डॉ. दादासाहेब पावटे यांच्या अध्यक्षतेखाली एक परिसंवाद धारवाड येथे आयोजिण्यात आला होता. याच प्रसंगी त्यांचा सत्कारही करण्यात आला.

श्री. शं. बा. जोशी यानी आज वयाची पंचाहत्तरी पूर्ण केली आहे; परंतु तरुणाला लाजविणाऱ्या उत्साहाने त्यांचे लेखन, वाचन, चर्चा सुरू असते. धारवाडच्या साधनकेरे भागा-तील आम्रवृक्षांनी वेढलेल्या छोटयाशा, साध्या बंगलीत त्यांची साहित्यसाधना सुरू असते. त्यांचा सहवास म्हणजे एक बौद्धिक मेजवानी असते. आजच्या तरुणांनी पारंपरिक बंधनापासून दूर राहून विचारवंत आत्मे म्हणून आपले स्थान निर्माण करावे. तर्काधिष्ठित श्रद्धा बाळगणारे आणि समाज-सेवेच्या प्रेरणेतून निर्माण झालेली कृती करणारे तरुणच भारताला एक महानराष्ट्र बनवू शकतील असा त्यांचा विश्वास आहे. याच एका सूत्रातून त्यांच्या साऱ्या जीवनाची वाटचाल झाली आहे. श्री. शं. बा. जोशी यांच्या या महान गौरवाच्या प्रसंगी ते शतायुषी व्हावेत, हीच प्रार्थना आहे.

---



अनुक्रमणिका






# वाचकांचा पत्रव्यवहार

(१)

रा. श्री. संपादक नवभारत यांस,

नवभारतच्या नोव्हेंबर ७० च्या अंकात डॉ. मिराशी यांनी " त्रिभाषासूत्रात संस्कृतचे स्थान" हा लेख लिहून संस्कृतच्या शिक्षणाबद्दल फार महत्त्वाच्या सूचना केल्या आहेत. राष्ट्रीय एकात्मतेच्या नावाने गळे काढायचे व राष्ट्रीय एकात्मता साधणाऱ्या सर्व शक्तींना नामोहरम करण्याचे आटोकाट प्रयत्न करायचे असा प्रकार स्वराज्यानंतर सर्रास सुरू आहे. भाषाध्ययनाच्या बाबतीत तर आमच्या पारतंत्र्यपूजेने चरम सीमा गाठली आहे. शैक्षणिक मनोविज्ञानाच्या प्राथमिक तत्त्वांनाही हरताळ फासण्यात येत आहे.

खालील मुद्यांचा विचार झाल्यास ही निराशाजनक परिस्थिति सुधारण्यास मदत होईल असे वाटते.

१) घरापासून डॉक्टरेटपर्यन्त मातृभाषा हे शिक्षणाचे माध्यम असल्यास प्राथमिक व माध्यमिक शाळेत मिळून तिचे जे आठ वर्षे अध्ययन होईल ते पुरेसे आहे. भाषेचा सतत वापर करणे हाच तिच्यात प्रावीण्य संपादन करण्याचा एकमेव मार्ग आहे. मातृभाषेचा माध्यम म्हणून सततच उपयोग होणार असल्यामुळे स्वतंत्र विषय म्हणून आठ वर्षांपेक्षा अधिक काळ ती सक्तीची करण्याची जरूरी नाही.

२) डॉ. मिराशी म्हणतात त्याप्रमाणे हिंदी ही भाषा अतिशय सोपी असल्यामुळे माध्यमिक शाळेतील चार वर्षांपेक्षा अधिक काळ तिचा अभ्यास आवश्यक असण्याचे कारण नाही.

अर्थात् उच्च शाळेत हिंदी व मातृभाषा यापैकी कोणतीच भाषा आवश्यक असण्याचे कारण नाही. तेव्हा उच्च शाळेतील तीन वर्षे संस्कृत आवश्यक करणे काहीच कठिण नाही.

ही तीन वर्षे संस्कृतचा अभ्यास साक्षात् पद्धतीने व्हावा, व्याकरणावर भर देण्यात येऊ नये. या पद्धतीने संस्कृत शिकून रामायण-महाभारताची भाषा समजण्याइतकी प्रगति सहा महिन्यात होऊ शकते हे मी प्रत्यक्ष प्रयोगे करुन सिद्ध केले आहे.

३) संस्कृत शिकविण्यात दुसरा उद्देश संस्कृतची शब्दसिद्धि शिकविणे हा असावा. संस्कृतचे मूळ १७०० धातु व त्यांच्यापासून मोजके प्रत्यय लावून लक्षावधि शब्द तयार करण्याची प्रक्रिया प्रत्येक सुशिक्षित भारतीयास अवगत असली पाहिजे. ही प्रक्रिया सहजपणे हाताळता आली म्हणजे सर्व भारतात याच प्रक्रियेतून निर्माण झालेले शब्द वापरण्याची प्रवृत्ति दृढमूल होईल. या शब्दसिद्धीवर केलेल्या एकदोन महिन्याच्या परिश्रमाने लक्षावधि शब्दावर प्रभुत्व प्राप्त होईल व ज्याचा एकमेकाशी काहीही संबंध नाही असे फारसी व इंग्रजी शब्द भाषेत घुसडून तिचे शब्द प्रसविण्याचे सामर्थ्य नाहीसे करणे किती वेडगळपणाचे आहे याचा प्रत्यय येईल. सगळ्या भारतीय भाषात हीच शब्दावलि रूढ होऊन त्यात काका कालेलकर म्हणतात त्याप्रमाणे फक्त प्रत्ययांचाच भेद उरेल; व एकमेकांची भाषा न शिकताही कळू शकेल. शिवाय विज्ञानाची परिभाषा समजण्याचे व निर्माण करण्याचे सामर्थ्य प्रत्येक विद्यार्थ्याला येईल.

(४) संस्कृत भाषेचे ज्ञान ज्या विषयांच्या अभ्यासास आवश्यक आहे त्यांची यादी डॉ. मिराशींनी दिली आहे. वास्तविक ही यादी यापेक्षा पुष्कळच लांब असायला हवी- गणिताच्या व ज्योतिःशास्त्राच्या तज्ज्ञास आर्यभट्ट व भास्कराचार्य यांच्या ग्रन्थांचे ज्ञान नसेल, डॉक्टराला आयुर्वेदाचे ज्ञान नसेल व वास्तुविदांना भारतीय शिल्पशास्त्राचे ज्ञान नसेल तर ते खऱ्या अर्थाने तज्ज्ञ आहेत असे म्हणता येणार नाही.

यावर भारतीय शास्त्रांची " जीर्णविद्या " म्हणून संभावना करणारे मेकॉलेचे मानसपुत्र " हे पुढे उकरण्याची काय जरूर आहे " असे विचारणाऱ्यांना भारतीय विज्ञानाचेच केवळ नव्हे तर ज्ञानाच्या स्वरूपाचेच मुळात आकलन नाही असे म्हटले पाहिजे. एकतर आयुर्वेदादि शास्त्रात जो पाश्चात्य तज्ज्ञांनाही ग्राह्य वाटेल असा नवा भाग पुष्कळच आहे. दुसरे असे की ज्ञान केव्हाही जुने होत नाही. उपपत्तिच फक्त जुन्या होतात. आज अधिक कार्यक्षम अशी वेधयन्त्रे निघाल्यामुळे जन्तर मन्तर सारख्या

वेधशाळा बान्धणे आवश्यक नाही. पण याचा अर्थ जन्तरमन्तर ज्या ज्योतिर्विषयक तत्वावर आधारले आहे ती तत्वे आज गतार्थ झाली आहेत असा नाही. ही तत्वे ज्याला समजत नाहीत त्याचे ज्योतिष ज्ञान परिपूर्ण आहे असे म्हणता येणार नाही.

संस्कृत भाषेतील सर्व शास्त्रांचा आजही मुळातून अभ्यास होणे दुसऱ्याही एका कारणासाठी आवश्यक आहे. विज्ञान ही पाश्चात्यांची देणगी आहे व आम्ही या क्षेत्रात उपरे आहोत असा गण्ड भारतीयात निर्माण करण्याचा कसोशीने प्रयत्न झाला. हा गण्ड दूर होऊन आमची अस्मिता जागृत झाल्याखेरीज या देशाची वैज्ञानिक प्रगति होणार नाही. भारतीय विद्यांचे पुनः अध्ययन सुरू झाले म्हणजे रसेल हा गंगेशाचा, पाश्चर व हार्वी हे चरकसुश्रुतांचे, आणि न्यूटन व आइन्स्टाइन हे आर्यभट्ट व भास्कराचार्य यांचेच उत्तराधिकारी आहेत याचा प्रत्यय येऊन या देशात विज्ञानाची नवी परंपरा निर्माण होईल.

— नी. र. वऱ्हाडपांडे

(२)

श्री कार्यकारी संपादक,
नवभारत मासिक
यासी नमस्कार वि. वि.

जानेवारी १९७१ चे अंकात तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचा महाराष्ट्रातील धर्मसुधारणेचे आंदोलन हा चांगला लेख प्रसिद्ध झाला आहे, त्याला पोषक असा हा मजकूर आहे म्हणून देत आहे.

महाराष्ट्रातील धर्मसुधारकांमध्ये कालदृष्ट्या लोकहितवादी व महात्मा फुले यांच्यापूर्वी किंवा समकालीन श्री. ब्रह्मचारी विष्णुबुवा ( गोखले ) ही एक मोठी विभूती होऊन गेली. मुंबईस त्यांनी चौपाटीच्या वाळवंटावर हजारो सभा घेतल्या. अनेक सुधारणांचा पुरस्कार केला, अनेक आक्षेपकांना विशेषतः पाद्र्यांना त्यांनी चोख व सडेतोड उत्तरे दिली. 'वेदोक्त धर्मप्रकाश' हा त्यांचा उत्कृष्ट ग्रंथ होय. अस्पृश्यतेचे उच्चाटण, शुद्धि, पुनर्विवाह, घटस्फोट, जाती मोडणे इत्यादि सर्व सुधारणांचा उद्घोष याच महापुरुषाने केला तेव्हा त्यांना विसरू नये.

( २ ) महाराष्ट्रातील १९२० ते १९५० या काळात ज्यांनी धर्मसुधारणांचे आंदोलन केले त्या ब्र. गु. केवलानंद, कै. दप्तरी, म. म. काणे या त्रिवर्गाच्या नावाबरोबर शंकराचार्य डॉ. कूर्तकोटी यांच्या नावाचा उल्लेख हवा. हिंदुधर्मपरिषद स्थापून तिची नाशिक, नागपूर, पुणे, हैद्राबाद, यवतमाळ, देऊळगाव राजा इत्यादि ठिकाणी प्रचंड अधिवेशने भरवून त्यांनी जे लोकजागृतीचे प्रचंड कार्य केले त्याला तोड नाही. ब्राह्मणेतर वाद मिटविणे, क्षत्रियांची वेदोक्त उपनयने करणे, शुद्धि, मंदिर प्रवेश, जात्युच्छेद इत्यादि सर्व कार्ये श्री. शंकराचार्य डॉ. कूर्तकोटी यांनी करून दाखविली यास्तव त्यांचे विस्मरण न व्हावे.

( ३ ) महाराष्ट्रामध्ये श्री. केवलानंद यांनी परिवर्तनवादी पक्ष व परिषद स्थापन केली. कै. दप्तरी व म. म. काणे यांनी उत्तम ग्रंथ प्रकाशित केले; त्या ग्रंथामध्ये म. म. काणे यांचा 'धर्मशास्त्रविचार' या ग्रंथाचा उल्लेख हवा. माननीय काणे यांनी मुंबई ब्राह्मणसभेमध्ये धर्मसुधारणाविषयी दिलेली विद्वत्ताप्रचुर व्याख्याने श्री. ओगले यांनी लिहून काढून प्रेसकॉपीच दिली त्यामुळे तो ग्रंथ लोकप्रसिद्ध झाला व अतिशय लोकप्रिय झाला त्या ग्रंथाप्रमाणेच- **धर्मस्वरूप निर्णय** हा तर्कतीर्थ कोकजेशास्त्री यांचा मोठा उपयुक्त ग्रंथही पुढे आला. गुरुवर्य केवलानंदांनी जी इतिहासपद्धती मांडली तिचे सांगोपांग व शास्त्रीय विवेचन 'धर्मस्वरूप निर्णय' या ग्रंथामध्ये आहे. तात्पर्य महाराष्ट्राने वरील व्यक्ती व ग्रंथ यांना विसरू नये.

— **पं. महादेवशास्त्री दिवेकर**






